|| श्रीउद्योगदेवता प्रसन्न. ||

ज्ञानमित्र पुस्तक-माला, पुष्प बत्तीसावें.

# चव्हाणी समशेर !



लेखक,

लक्ष्मण नारायण जोशी,

गृहिणी कर्तव्य, रशियांतील बोल्शेविझम, रशियाचें सूर्यग्रहण ! अस्तोदय वगैरे पुस्तकांचे कर्ते.



प्रकाशक व मुद्रक,

नारायण बळवंत चव्हाण.



प्रथमावृत्ति. ]    सन १९२३.    [ किं. एक रुपया

सचित्र

# आनंद–मठ

बंगालचे साहित्य संम्राट कादबरी लेखक स्वर्गीय, बंकिमचंद्र चट्टोपाध्याय, सी. आय. ई. याच्या प्रतीभाशाली राष्ट्रीयभावना उद्दीपक कादंबरीचा हा श्रीयुत, भा. श्री. कुलकर्णी यांच्या तेजोमय लेखणींतून उतरलेला रसभरीत अनुवाद आहे. ज्या कादबरीतील " वंदेमातरम् " गीतानें सर्व भरतखंड जागृत केला, ज्या कादंबरीच्या गुजराथीत, हिंदींत व बगालींत हजारों प्रती खपल्या त्या ऐतिहासिक कादंबरीचा अद्भुत प्रसगानीं नटविलेला, चटकदार व स्फूर्तिदायक अनुवाद एकदा वाचा. किं. १०४ व्ही. पी. नें १०८.

प्रो. ज्ञानमित्र, शनिवार पेठ, पुणें सिटी.

हें पुस्तक पुणें, पेठ शनिवार घ. नं. ४८३ येथें; नारायण बळवंत चव्हाण यांनीं आपल्या " हरिहर " नामक छापखान्यांत छापून ज्ञानमित्र कचेरी, शनवार पेठ, पुणें शहर येथें प्रसिद्ध केलें.

# प्रस्तावना.

द्वापारयुगातील भीमार्जुनाप्रमाणें ज्यांचा पराक्रम होता, स्वधर्म-संरक्षण हेंच ज्यांचें ब्रीद होतें, स्वदेशाच्या शत्रूला नामशेष करण्यासाठींच ज्यांनीं आपल्या हातीं शस्त्र धरिलें होतें, घोरीसारख्या परधर्मीय अघोर शत्रूला ज्यांनीं उदार अंतःकरणानें आणि खऱ्या आर्यब्रीदाला शोभेल अशा प्रकारें त्याचा पाडाव झाला असतांहि—आपल्या दरबारीं वागविलें, आपसांतील दुही मोडण्यासाठीं ज्यानीं स्वकीय शत्रूपुढें मोठ्या संतोषानें पड खाण्याचा स्वभावाकरितां प्रयत्न केला. आणि ज्यांनीं अंतःकलहाची राखरांगोळी व्हावी म्हणून आपल्या सार्वभौमादि अधिकारांचाहि त्याग करण्याचें योजिलें त्या कैमासपृथ्वीराजांच्या सारख्या अतुल पराक्रमी जोडीची फक्त स्त्रियांच्या अभिलाषानें जी अतर्क्य हानी होऊन, स्वातंत्र्यांतील स्वराज्याची अखेरची करुणप्राय होळी झाली त्याचें चित्र या पुस्तकांत रेखाटण्याचा जो प्रयत्न केला आहे, तो कितपत साधला याची परिक्षा वाचकवर्ग करीलच.

हिंदी महाकवी जो चंदावरदायी त्यानें रचिलेल्या 'पृथ्वीराज रासा' या नांवाच्या काव्यग्रंथाची जी नवी उपलब्धी झालेली प्रत काशीच्या नागरीप्रचारिणी सभेनें मोठ्या प्रयासानें प्रसिद्ध केली आहे, तींतील आवश्यक अशा ऐतिहासिक भागाची मदत घेऊन इतिहासाला धक्का न लावतां हें पुस्तक 'महाराणा प्रतापसिंह चरित्र' ज्या पोषाखांत बाहेर आणिलें आहे त्याच पोषाखांत जरी बाहेर आणण्याचा प्रयत्न केला आहे, तरी यांत त्या चरित्राप्रमाणें जागोजाग ऐतिहासिक

आधाराच्या पादटिपण्या ज्या दिलेल्या नाहींत तें यातलें वैगुण्य वाचकाच्या ध्यानांत येणें सहाजिक होणार आहे.

हें यांत जें वैगुण्य आम्ही मुद्दाम ठेविलें आहे त्यातील आमचा मतलब फार निराळा आहे. ' पृथ्वीराज चव्हाण अथवा देहलीचा अखेरचा आर्य साम्राट ' या नावाचें जें दुसरें पुस्तक आम्ही सध्यां लिहीत आहोंत, त्यांत हें वैगुण्य आम्ही पूर्णपणें काढून टाकणार आहोंत. ते ऐतिहासिक मनोरंजक चरित्रहि अगदीं आधुनिक कालापर्यंत उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक माहितीवरून लिहित असल्यानें, या पूर्वी प्रसिद्ध झालेल्या व सरकारी शिक्षण खात्यानें शाळाच्या अभ्यासक्रमात उपयोगासाठीं मंजूर केलेल्या ' लोकहितवादी ' कृत पृथ्वीराज चरित्राशीं बऱ्याच फरकाच्या ऐतिहासिक कथानकात दिसणार आहे हें वाचकवृंदाच्या नजरेस येईलच.

ऐतिहासिक माहितीच्याच केवळ पायावर मोठ्या मनोरंजक स्वरुपाच्या कादबरीच्या रुपांत—सत्याला किमपीहि धक्का न लावता—एकाच अद्वितीय रणशूरांचीं दोन भिन्न स्वरुपांत चरित्रें एकाच लेखकाला साद्यंतपणें कशीं लिहितां येऊं शकतात याचें प्रत्यंतर आणून देण्यासाठींच, उपरिनिर्दिष्ट प्रकारचीं जी चरित्रें प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे, त्यांतील प्राकृत पुस्तक हें पहिलें होय. अशा प्रकारचा हा पहिलाच प्रयत्न असल्यानें तो कितपत साधला आहे याची छाननी आपोआपच होईल, इतकें निवेदन करून ही प्रस्तावना संपवितों.

पुस्तक लेखक,

**लक्ष्मण नारायण जोशी.**

# अनुक्रमणिका.

जगद्विख्यात वंगीयसाहित्यसम्राट, कविराज
रवीन्द्रनाथ टागोर, के. टी. डॉक्टर ऑफ लिटरेचर
त्यांच्या खास परवानगीनें मराठींत प्रसिद्ध होणारी

# शान्तिनिकेतन माला.

भारतवर्षाला भूषणभूत झालेले वंग महाकविवर **रवीन्द्रनाथ टागोर** यांची असाधारण व अलौकिक विद्वत्ता, योग्यता, अपूर्व कवित्वशक्ति, अगाध देशभक्ति, सर्व विषयात दिसणारी प्रतिभा ह्याविषयी ज्यांची जगभर ख्याति होऊन, ज्याना बहुमानाचें **नोबल प्राईज** " मिळून ज्याची सर्वतोमुखीं स्तुति ऐकूं येते, त्या सर रवींन्द्रनाथच्या बंगाली **शांतिनिकतनाचा** हा मराठी स्फूर्तिदायक अनुवाद आहे. निसर्गाशीं तन्मय झालेल्या एका निसर्ग—उपासकाची ही कृति आहे. यांत वेदान्तासारख्या गहन विषयाचें व्यवहारिक दृष्टीनें सुलभ व रसभरित काव्यमय विवेचन करून त्याचें श्रेष्ठत्वाचा ठसा वाचकांचे हृत्पटलवर वठवून, आपण सध्याच्या जीवनकलहांत कसें वागलें असतां आपल्याला प्रपचांत राहूनसुद्धां परमार्थ कसा साधता येईल, याचें फारच मार्मिक व मुद्देसून विवेचन केलें असून ठिकठिकाणी अनेक प्रचलित प्रश्नांवर अगदीं नवा प्रकाश पाडला आहे. यांतील प्रत्येक भाग वाचतां वाचतां शुष्क अंतःकरणांतसुद्धां आत्मप्रकाशाची पवित्र मन्दाकिनी प्रवाहित होऊं लागते. शुद्ध व सात्त्विक प्रेमाच्या विचाराचा अखंड वाहणारा झरा आहे तो प्रत्येकाला हिंमतवान् व कार्यक्षम करील. शान्तिनिकेतन, उदयोन्मुख भारतभूमीतील प्रत्येक व्यक्तिला

आत्मतत्वाची—आपलेपणाची—ओळख पटवून देऊन, राष्ट्रीय जागृती उत्पन्न करणारी ही राष्ट्रीय संजिवनी आहे, म्हणून प्रत्येक महाराष्ट्रभाषाप्रेमी, देशप्रेमी, धर्मनिष्ठ अशा वाचकांनीं या अखंड शांतिसुखाचा लाभ करून घ्यावा.

## शांतिनिकेतन—प्रकाशनाची योजना.

सर रवीन्द्रनाथाच्या अनुकरणीय चरित्रासह बारा भागत हा ग्रंथ पुरा करण्यांत येईल. रॉयल सोळा पेजी साईजच्या सुमारें दोनशें पृष्ठांचा एक भाग, दर दोन महिन्यांनीं प्रसिद्ध होणार असून प्रत्येक भागाची किंमत एक रुपया ठेवण्यत येईल. या महिनाअखेर आठ आणे प्रवेश फी भरून नांवें नोंदविणारास कायमचे ग्राहक समजून प्रत्येक भाग बारा आणे, व्ही. पी. नें १॥२ स पडेल. प्रवेश फी केव्हांही परत मिळणार नाहीं. पहिला भाग सवलतीची किंमत ॥१२ प्रवेश फी ॥८ व व्ही. पी. पोस्टेज चार्ज ॥६ एकूण १॥१० चे व्ही. पी. नें भाग तयार होतांच पाठवूं. पहिल्या भागांत रवींद्रनाथाचे सुंदर छायाचित्रासह रसाळ चरित्र व शान्तिनिकेतनाचा हृदयभेदक भाग येणार असून, पुढें प्रत्येक भागांत **स्वराज्य—होमरूल** वरील अखिल जगांत जागृती करणारे अत्यंत तेजोमय निबंधक लेख आणि फोटो देऊन प्रत्येक भाग अधिकाधिक **सुबोध, रसाळ, चित्ताकर्षक,** व **सात्त्विक** करण्याचा संकल्प आहे; म्हणून आजच नांव नोंदवा.

**प्रो. शान्तिनिकेतनमाला,** शनवार पेठ, **पुणें—सिटी.**

# चव्हाणी समशेर !



## प्रथम काण्ड.

### सैन्यसमारोह



( भुजगप्रयात. )

दमामे सनाया तुम्ही वाजवारे ॥
रणाच्या सुरांनां तुम्ही ऐकवारे ॥
स्वसैन्या लढाया तुम्ही चालवारे ॥
जयाच्या पताका तुम्ही डोलवारे ॥ १ ॥

—सौमित्र.

सूर्यनारायण रक्तवर्ण धारण करून जगतावर आपली प्रभा फांकीत उदयाचलावर आरोहण करीत आहे. सूर्यकांतीनें पर्वतमालांमीं विचित्र शोभा धारण केली आहे. त्या रविप्रभेनें प्रथम हिमयुक्त पर्वतशिखरांवर आपली दैदीप्यमान प्रभा पसरून नंतर हलके हलके पर्वतमध्यावरून पायथ्यावर व तेथून सर्व मैदानावर आपला पूर्ण अंमल बसविण्याचा

क्रम चालविला आहे. उदयचलावर येणाऱ्या दिवाकराने बघुक पुष्पगुच्छाप्रमाणें नाना तऱ्हेच्या रंगांची कांति फक्त पर्वतावरच धारण केली नसून, निकटवर्ती अशा सर्व प्रदेशावर त्यानें आपलें विचित्र रूप पसरलेलें दिसूं लागलें आहे. औदासीन्यानें मलिन झालेली मनेंसुद्धा आनंदित व्हावींत तशी शोभा पर्वतगव्हरांतून वाहणाऱ्या नद्यांच्या प्रवाहावर नाचणाऱ्या सूर्यकिरणाची दिसू लागली आहे. एके बाजूस द्रुत गतीनें धावणाऱ्या नद्यांच्या प्रवाहाचा खळखळाट चालू आहे, तर दुसरीकडे—भूमिप्रदेशावर जाण्याची त्वरा करणाऱ्या निर्झरोदकाच्या धबधब्याचा प्रचंड प्रतिध्वनी ऐकू येतो आहे. मत्त हत्तींच्या गंडस्थलांतून वाहणाऱ्या दानोदकाप्रमाणेंच ती जलौघाची शोभा दिसते आहे. पर्वतमस्तकावरून झपाट्यानें खालीं पडणाऱ्या हिमामुळें असमतान्भागांतील हिरवीगार वनराजी लुप्तप्राय झालेली दिसते आहे. अशा त्या पर्वतावर—वनांतील पौष्टिक मेव्याच्या वृक्षांची इतकी गर्दी होती कीं, त्यांची गणती करणेंच अशक्य होय. जीवजंतु इतस्ततः संचार करू लागले आहेत. प्रभातकालीन व्योमचारी पक्षी आपआपलीं पिसें चंचुपुटांनीं शोधून गगनमंडलांत उड्डाण मारू लागले असून, त्याच्या मागें त्यांचीं पिलें चिंव चिंव किलबिल असा ध्वनि करीत धावत आहेत.

अशा तऱ्हेनें विहंगवृंद आकाशांत उडून जात असतां दुरून पाहणाऱ्याला तीं भूपृष्ठावरील हरित वर्ण शेतेंच हवेंत पोहताहेत असा

भास होत होता. अशा त्या प्रभातसमयी पर्वतस्थ मानवी प्राणीहि हलके हलके इतस्ततः भ्रमण करण्याच्या विचारांत होते. कोणी पाचोळा जमविण्याच्या विचारांत आहेत व कोणी लाकडें तोडून आणण्यासाठीं खांद्यावर कुऱ्हाडी घेऊन घराबाहेर पडत आहेत. अहीरी लोक आपल्या शिकारी कुत्र्याना चुचकारून त्याच्या पाठी थोपटीत आहेत. काहींचे कुत्रे दुरून आपल्या धन्याकडे शेंपट्या हालवीत व जिभाच्या लोळाचे लपलपाट करीत धावत येत आहेत व कांहींचे कुत्रे शिकारीला जाण्यासाठीं मालकाच्या भोंवतीं घिरट्या घालीत आहेत.

अशा प्रकारची निसर्गशोभा ज्या पर्वतावर दिसत होती त्याच पर्वताच्या एका भागावर एक मोठा चमत्कारिक देखावा दिसत होता. मोंगलांचे स्वार आपापले भाले सूर्यकिरणांत चमकावीत घोड्यांना लगाम घालीत होते. घोड्यांचें खिंखाळणें सुरू असून, भाल्यापताकांचे फरारे हवेंत डोलत फर्र फर्र करीत होते. सर्व तयारी झाल्यावर ते घोडेस्वार कोठें तरी जाण्यास निघाले. जातांना ते आपसांत गोष्टी बोलत चालले होते.

एक—आज हिंदुओंकी शामत आई है!

दुसरा—आजि शामत क्या? इनपर तो हमेशाही शामत सवार रहती है! ये निरे जाहिल और बेवकूफ है! खाली मरने मारनेसे भला कोई बहाद्दर कहलाता है? इसमे कौमी जोश तो बिलकुल ही नही है!

तिसरा—आपका कहना तो वजा है! पर, इनकी दिलावरी और बहादुरीसे तो कहनाही पडेगा कि ये सब वाकईमे शेर दिल् और अग्जू है!

चौथा—खॉ साहब, यह सब तो ठीक है, पर एक बातकी हिंदू ओमें सख्त शिकायत है! ये मिलकर काम कनना नही चाहते. मौकेपर तो ये और भी छुट मुट हो जाते हैं! हमी लोगोंको देखिये किस तरी के हमारे शाह साहबने अपनी पहाडी कौमोंको मिल रख्खा है!

पांचवा—वल्लाह अफरी है आपके इन ख्यालतो पर! शुभान् अल्ला! कहातक आपने दौड मारी है कि हवाको भी मात कर दिया! अजी जनाब, आप पहले पहल न जंगमे चल रहे है? इस वजहसे इतनी बहकी बहकी बाते कर हे है! अगर आपको कभी इन राजपूत या छत्री कौमोसे साबका पडा होता तो कदर अफियत हो जाती. बकौले शख्स ' कदर आफियात आँकसे दानद, केव मुसीबत गिरफ्तार आयद ' ( जो मनुष्य विपत्तीत पडतो त्यालाच सुखाची किंमत समजते ) किसी आला खयाल्त ने क्या अच्छा कहा है! ऊंट जबतक पहाडके नीचे नही आता, तब तक वह किसी को अपने से ऊंचा नहीं देखता!

खांसाहेब—जनाब मीरसाहब, आपका कहना वजा है! पर याद रखीये, मुगल या तातार लोग मी कुछ ठंडे हाथोंसे तलवार नहीं पकडते.

मीरसाहेब—यह सब तो ठीक है! पर खांसाहब, वह पीर. घाटीवाली लढाई भूल गये? जिसमे खाली तीनसौ राजपुतोंने तीन हजार काबुलीयोंको रोख रक्खा था!

खांसाहेब—बजा है! पर मीरसाहब, रोकने रुकानेसे काम नहीं चलता. दुनियामें चाला की और फरेबसे भी काम केना चाहिये. देखिये, हिंदूओंकी फूट तो महशूर ही है! उन्हींके मुल्कमे जयचंदने मेरे शाहसाहबके पास मदद देनेको पैगाम भेजा है! कहिये भला इनको क्या फतह नसीब होगी? ये खाली बें बें चें चें करते रहे और खाया पीया सोया करें, सल्तानतसे इन्का क्या सरोकार?

अशा प्रकारच्या गप्पागोष्टी करीत तें मोंगलांचें घोडदळ चाललें असता त्याच्या मागून पायदळहि रस्ता काटीत चाललें होतें इतक्यांत रस्त्यांत एका सैनिकानें मध्येंच येऊन त्यांस अशी बातमी दिली कीं, ‘सैन्याचा मुक्काम इथेंच करावा. कारण, सूर्य बराच वर आला आहे, त्यामुळें सैन्याला त्रास होईल.’ असा हुकूम ऐकण्याबरोबर चारी बाजूनीं नफरीचा आवाज सुरू झाला. घोडदळ व पायदळहीं तेथेंच थांबली. स्वारांनीं घोड्यांचे लगाम काढून त्यांच्या गळयांत काढण्या बांधल्या व त्यांना ओळीनें मेखांना बांधून टाकले. कोंवळें हिरवेंगार गवत घोडे खाऊं लागून फुरफुराट करूं लागले.

सैनिक थकले होते. ते विश्रांतीकरितां केव्हां हुकूम होतो याचीच वाट पहात होते. त्या वेळीं त्यांनां थंडगार पाण्याची आवश्यकता भासत होती. त्यांच्या सुदैवानें त्याना जवळच एक स्वच्छ पाण्याचा झरा असलेलें स्थळ दिसलें. तेथें जाऊन सर्व सैनिकांनीं आपली तहान प्रथम भागवली आणि नंतर घोडेस्वारांनीं आपल्या घोड्यानाहि पाणी पाजलें. सर्वत्र आनंद झाला अशा तऱ्हेची त्या वेळीं जर विश्रांति मिळाली नसती, तर माणसें व घोडे खात्रीनेंच आजारी पडलीं असतीं.

परिश्रमानंतर अराम जर मिळणार नाहीं तर मोठी हानी होते. पायदळाच्या सैनिकांनीं आपले लष्करी कपडे उतरून जवळच्या सरोवरात जाऊन हातपाय तोंडें वगैरे गार पाण्यानें स्वच्छ धुतलीं. पर्वताच्या पश्चिमभागीं—लष्कराचा खाना तयार करणाऱ्यानी चुले पेटवून त्यांवर मोठाले डेरे चढविले. बकरे, म्हशी आणि इतर काहीं रानटी जनावरांचें स्वच्छ धुतलेले मांस त्यात शिजत लावलें. भिस्त्यांनीं पाण्याची रेलचल करून सोडली. त्या पाहाडांतील अनेक तऱ्हेचे जंगली मेवे व मसाले मांसात टाकण्यांत आले. पुलाव्याचीहि भांडीं चुल्यांवर ठेवण्यांत आलीं. जंगलातील लांकडांनीं चुली नुसत्या भट्टयांसारख्या प्रदीप्त झाल्या. अशा तऱ्हेनें मोंगली सैन्याच्या खान्याची तयारी सुरू असतां, चारी दिशांना पाहारा देणाऱ्यांचा पाहारादी सुरू झाला. अशा तऱ्हेनें एका बाजूला खाना तयार होण्याचें काम सुरू असतां, दुसऱ्या बाजूला सेना-

ध्यक्ष तातारखान व जमालखान यांनीं पुढें जाण्याच्या मार्गाचा नकाशा आपल्यापुढें ठेवून आपसांत वादविवादात्मक चर्चेला सुरवात केली होती.

पुढील मार्ग आक्रमण कसा करावा याबद्दल त्या दोघांत वाटाघाट होत असतां, मध्येंच तेथें एकजण येऊन म्हणाला कीं, " शाह-साहब बुलाते है ! " दोघेही सेनाध्यक्ष तावडतोब उठून शाहसाहेबाकडे गेले.

तातारखानानें नम्रतापूर्वक सलाम करून म्हटलें, " जो इरशाद, खाकसार हजर है ! क्या कोई मशविरा पेश है ? अक्कयामत ! किसी बातका अदेशा न फरमावे ! यह खादिम बातकी बातमें अमर-सिंहको घर दाबावेगा ! "

निसुरतखां—जहांपनाह, अमरसिंह कोई बहादुर नही है. वह तो अदनासा राजा है ! सिंध जैसे भारी मुल्कपर दखल करनेमें सर-कार को कुछ तरतुदद नही करनी पडेगी. इस वक्त तो हुजूरकी ताबे-दारीमें पांच सौ हाथी, एक लाख सवार और काबुली, पंजाबी, रूमी, गोरी, अरब वगैरा एक लाख पैदल खूशाल सिपाही तैयार हैं !

आपल्या सेनाध्यक्षाचें म्हणणें ऐकल्यावर शहाबुद्दीन घोरी म्हणाला " नहीं, नहीं ! मैने सुना है के वह बडा बहादर है ! वह सच्चे क्षत्रियों के समान बडा ही बहादर है ! वह अपनी जान दे देगा पर धर्म न छोडे गा ! निसुरतखां, मेरा इरादाही कुछ और है ! वजाय इसके की लडाईमें मारा जाय, अगर वह मजहबे इसलाम कुबूल करले

तो ज्यादा कार आमद हैं ! क्योंकि अबतक हिंदुस्तानके ही आदमी मजहबे इस्लामको कबूल न करलें, तबतक इसकी बुनियाद उस मुल्कमे पडनी मुश्कील है ! मुसलमानोंका क्यां ? आज वहां रहे, कल यहां चले आये ! इसलिये, यह अच्छा होगा कि हिंदोस्तानहीमें रहकर इन्से रोटीबेटी कर लिजाय ! हमारी राय तो यह है कि इस फतहकेबाद जहादका झंडा खडा कर दिया जाय और मुल्के हिंदुस्तानके चुनीदा राजामहाराजाओंको कल्मा बढाया जाय ! बस इसी तौरपर हजरत मुहम्मदका उसूल लोगोंमे बढाया जा सक्ताहै ! वरना इसीतरहसे मासकाट करते तो हजारों बरस बीत जाएगे पर, हमलोगोंका किया कुछ न होगा !

याप्रमाणें घोरीचे विचार ऐकून, निसूरनखान बोलला कीं, " हुजूरका फरमान बहोत वजा है ! और जो जो तरकीबे हुजूरनें फरमाई है वेभी बहुतही आला है ! " तातारखानानेंही होस हो ठोकून दिला ! सेनापतींनी या प्रमाणें होस हो ठोकलेला पाहून दरबारांतील इतरांनीं ही त्यांच्याच सुरांत आपला सूर मिळविला. सर्व दरबाऱ्यांची, एकवाक्यता झालेली पाहून घोरीचें हृदयकमल प्रफुल्लित झालें. त्यानें मोठ्या आनंदानें " बहादुरो, इन्शाय अल्लाह मौका हाथ लगा तो तमाम हिंदोस्तानको मुसलमान बनाकर छोडूं गा और इस्लामी झंडा हिंदुस्तानके एक सिरसे दुसरे सिरेतक उडता देख तब ठंडी

करूंगा! या परवरदिगर, वह दन कषनसीब होगा, जब हिंदोस्तान की जवानमर्द और खुबसूरत औरतें हमारे मुल्कमें आकर रहें गी! उन्के बहादर लडके मजहबे इस्लामकी तालीम पाकर हजरत सलाम-तकें उसूलोका हरफर्द बशरके जहान नशीन करें गे! खैर! कुछ मुजाखा नहीं! अरसा तो जरूर लगेगा, लेकिन अगर मुल्के हिंदमें कामयाबी हासिल हो जायगी तो और जगहोंमें तो बातकी बातमे होही जायगी!" इतकें बोलून घोरीनें कुराणातली एक आयत म्हटली व दरबार बरखास्त झाला.

दरबारच्या बरखास्तीच्यावेळीं अशी सक्त ताकीद देण्यात आली होती कीं, दुसऱ्या दिवशीं सकाळींच बटिंड्यावर सर्वांनीं जाऊन धड-कलें पाहिजे. या हुकूमाप्रमाणें सर्वांनीं "जो हुक्म हुजूर" असें आदबीनें म्हणून सर्व मंडळी निघून गेली होती. या वेळी खाना तयार झाला होता! सर्व सैनिकांनी खाना खाल्ला व ते उद्ईक तेथून सकाळींच कूच व्हावयाचा होता म्हणून विश्रांती घेत पडले.



# द्वितीय काण्ड.

## अमरसिंह.

( गीत्यर्ध. )

लक्ष्मी तशीच कोणी वेश्या सांगा स्वहस्तिं राखियली ?

—मुद्राराक्षस.

मागील काण्डांत सांगितलेलें सैन्य कोणावर चढाई करून चाललें होतें, याची वाचकांना आतां माहिती करून द्यायची आहे. वाचकहो, ऐका ! इसवी सनाच्या आठव्या शतकारंभीं आर्यावर्तावर पश्चिमेकडून यवनांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या होत्या. गिझनीच्या प्रसिद्ध महंमदानें सिंध, पंजाब, मुलतान वगैरे प्रांत काबीज करून आपल्या राज्याचे ते सुभे केले होते. असें जरी होतें तरी भरतखंडांत मुसलमानांचें निशाण शहाबुद्दीन घोरीच्या स्वारीपासूनच खरें रोंविलें गेलें. मुसलमानी स्वाऱ्यांचा उद्देश—भरतखंडातलें द्रव्यच फक्त हरण करण्याचा नसून व्यापाराबरोबर धर्महरण करण्याचीही त्यांची लालसा होती. याचमुळें पंजाबांतील शूरवीर राजे एकत्र झाले होते. त्यांनीं ऐक्यानें मुसलमानांच्या फौजांच्या लाटांना अडथळा करण्याचें ठरविलें होतें. त्यावेळीं

## द्वितीय काण्ड.

शहाबुद्दीन गिजनवींत आपला अधिकार चालवीत होता, त्यावेळीं— अजमीरांत सोमेश्वर, दिल्लींत अनंगपाल आणि कनोजांत जयचंद्र राठोर हे राज्यें करीत होते. या तीन राजकीय शक्त्यांचा प्रभाव त्या वेळीं आर्यभूवर इतका प्रबल होता कीं, त्यांचें ऐक्य असेपर्यंत, परकीयाना या आमच्या पवित्र आर्यभूमीवर पाऊलसुद्धां टाकण्याचें धाडस करवत नव्हतें. या तिन्ही राजसत्तांचा परस्पर असा काही संबंध होता कीं, कोणावरही दुःखाचा प्रसंग ओढवला तरी त्याचें निवारण करण्यास ते एकत्र जमत असत; परंतु ही गोष्ट फार वेळ टिकू देणें विधात्याला आवडलें नाहीं वृद्ध अनंगपालानें आपला सर्व राज्यभार पृथ्वीराज चव्हाणाच्या हवाली करून आपण तपश्चर्येसाठीं बद्रिकाश्रमीं जाऊन राहिला. पृथ्वीराजीनें सिंहासनावर बसणें कनोजच्या राजाला आवडलें नाही; पण करणार काय ? ऐक्याला झुगारणें शक्य नव्हतें.

जयचंदानें अनेक तऱ्हांच्या राजकीय डावपेंचांत पृथ्वीराजाला अडकाविण्याचे प्रयत्न केलें; परंतु ते सर्व निष्फळ झाले. शूर पृथ्वीराजानें अनंगपाळचें राज्य मोठ्या उत्कृष्ट कर्तबगारीनें चालविलें. अनंगपाळाच्या वेळच्या अनेक लबाडांना त्यानें शिक्षा दिल्या. जयचंदानें ही गोष्ट निराळ्या स्वरूपांत अनंगपाळाच्या कानांवर घातली व आपलें राज्य परत घेण्याची त्यास प्रार्थना केली; परंतु बक्षीस दिलेली वस्तु परत घेणें हें आर्यक्षत्रियास उचित नसल्यामुळें व पृथ्वीराजाचें करणें त्याला पसंत

असल्यामुळें त्यानें जयचदाच्या प्रार्थनेकडे लक्ष दिलें नाहीं व खऱ्या क्षात्रिय धर्माचें केलें.

जयचंदाचा असा जो अपमान झाला. त्याचा त्यानें असा सूड घेण्यास आरंभ केला कीं, पृथ्वीराजाला त्याच्या साह्याची ज्या वेळीं जरूर पडली त्या वेळीं त्यानें आपला हात आखडून धरला. शहाबुद्दीन घोरीचा चुलतभाऊ मीरहुसन हा एके दिवशीं पृथ्वीराजाच्या दरबारीं आपल्या भावाच्या भीतीनें गेला व आपलें रक्षण करण्याबद्दल त्यानें त्याची प्रार्थना केली. क्षात्रियधर्मानुसार पृथ्वीराजानें त्याला पाठीशीं घातला. यासाठींच शहाबुद्दीनानें पृथ्वीराजावर चाल केली. त्या प्रसंगीं जयचदानें पृथ्वीराजास मदत करण्याचें नाकारिलें व पृथ्वीराज या गोष्टींत अन्यायी आहे असें ध्वनीत केलें. इतकेच नव्हे तर प्रतिपक्षाला मदत करण्यांतच त्यानें आपली धन्यता व्यक्त केली. आतां अमरसिंहाच्या वर्तनाकडे वळूं.

सन ११७१ मध्यें सिंधूनदीच्या किनाऱ्यावर एका क्षत्रिय राजाची राजधानी बाटिंडागडांत होती. तें नगर मोठें भरभराटीचें व सुंदर होतें. दूरदूरच्या देशाशी त्या राजधानीचा व्यापार चालत असे. त्या ठिकाणीं अमरसिंह नांवाचा परमार वंशीय क्षात्रिय राजा नीतीपूर्वक राज्य करीत होता. त्या वेळीं बटिंडा नगर व्यापाराचें केंद्रस्थान झालेलें होतें. राजपुतानां, आफगाणिस्तान, काबूल बलुचिस्तान,

## द्वितीय काण्ड.

कंधार वगैरे ठिकाणचे धनिक व्यापारी, महाजन लोक व्यापारासाठीं त्या नगरात नेहमीं येत जात असत. मध्यम प्रतीच्या लोकांची ही तेथें वस्ती कमी नव्हती. तें शहर म्हणजे निर्धनांचें तर आश्रयसाधनच होतें. असें म्हणण्याचें कारण असें कीं तेथील राजानें, निराश्रित निर्धनांच्यासाठीं अनेक तऱ्हेच्या धर्मसंस्था तेथें स्थापन केल्या होत्या. तात्पर्य हें कीं, अमरसिंहानें आपलें राज्य, प्राचीन आर्यराजाप्रमाणें चालविलें होतें. सर्व पंजाब प्रांत जरी गिझनीच्या राजाच्या आमलाखालीं होता, तरी अजून पर्यंत या राजानें यवनाचें दास्य पतकरिलें नव्हतें. यास्तव, हें राज्य शहाबुद्दीनाच्या हृदयात शल्याप्रमाणें बोंचत होतें. एके दिवशीं शहाबुद्दीनाच्या दरबारात असा प्रश्न निघाला कीं अमरसिंहाचें निशाण मोठ्या डौलानें बटिंड्याच्या किल्ल्याच्या तटावर काय म्हणून फडकत रहावें ? तो इतका संपत्तीमान व मिजासखोर का असावा ? शिवाय चित्ररेखेसारख्या खुबसुरत वेश्येला त्यानें आश्रय कां द्यावा ? अशा तऱ्हेच्या घोरीच्या प्रश्नांना दरबारी मंडळीनें, नबाब पीरजाद्यानें वगैरे बरेंच प्रोत्साहन देऊन सरकारचें म्हणणें खरें आहे असें कबूल केलें. मग काय ? घोरी मनांतल्या मनांत लाळ घोटूं लागला. चित्ररेखे-संबंधानें तर दरबारी मंडळीनें अधिकच मीठ मिरची लावून प्रशंसा केली. वास्तविक पाहिलें असतां चित्ररेखा खरोखरच लावण्यमयी सुंदरी होती. तिचे रूपरंग, हावभाव, कटाक्ष वगैरे स्त्रियोचित गुणधर्मस्वभाव

स्वर्गीय अप्सरेला लाजविण्यासारखेंच होते, यांत संशय नाही. ती अमरसिंहाच्या प्रेमातली झालेली होती. अमरसिंहाचें चित्त त्या वेश्या-रूप कामलकलिकेंत भुंग्याप्रमाणें बद्ध झालेलें होतें असें जरी होतें, तरी उलटपक्षीं त्या वेश्येचें अमरसिंहावर कितपत प्रेम होतें त्याचें वर्णन करणें मात्र अशक्य आहे. त्या बाबतीत इतकेंच म्हणतां येईल कीं, अमरसिंह ज्या अर्थीं तिच्यावर अलोट प्रेम करीत असे त्या अर्थीं तिचें ही त्याच्यावर कांहीं तरी—निदान दरबारी प्रेम तरी असणें सहाजिक होतें. प्रेमा, तूं धन्य आहेस! तुझा महिमा अपरपार आहे. धनी, मानी, साधु, संत, फकीर वगैरे सर्व तुझ्या पाशांत जखडलेले असतात. तू जरी सुखाचें मूळ आहस असें वाटतें, तरी तें खोटें असून, तू खरें दुःखमूलकच आहेस! प्रेम्यांचा तू सर्वथैव नाश करतेंस. प्रेमी जोडप्याना जरी तू आनंददायक वाटतेंस तरी अखेर दुःखदायीच ठरतेंस. अमर सिंहापाशीं दहा हजार घोडेस्वार, वीस हजार पायदळ क्षत्रिय व वीस हजार म्लेंछसेना होती. तत्कालीन राजापेक्षां ही सेनासख्या कांहीं कमी नव्हती. या सिंधच्या राजाचें—तत्कालीन इतिहासलेखकानीं, जरी उत्तम प्रकारचें वर्णन दिलेलें नाहीं व इलियट नामक एका इंग्रज इतिहास लेखकानें ही जरी विशेष विस्तारपूर्वक या राजाचा इतिहास लिहिलेला नाही, तरी चंदबरदायी नावाच्या भाटानें जें रासमार नांवाचें काव्य लिहिलेलें आहे त्यावरून या बाबतीत बराच प्रकाश पडतो. रास-

## द्वितीय काण्ड.

सारांत—कविचंदाच्या विचारण्यावरून, चित्ररेखा व अमरासिंह यांची हकीकत हुसेनखानानें पुढील प्रमाणें सांगितली आहे. एके प्रसंगीं, शहाबुद्दीन घोरी यानें—आपले खुरासनखां, माफरूखा, तत्तारखां वगैरे सर्व शूर वीर मंत्री व सरदार यांना दरबारांत बोलावून असें विचारिलें कीं, सिंधूच्या किनाऱ्यावर छोटेसें राज्य करणारा अरबखा ( अमरासिंह ) माझा मांडलिक होण्यास तयार नाहीं. यास्तव, त्याच्यावर स्वारी करून त्याला जिंकावा अशी इच्छा आहे. सर्व सरदार व मंत्र्यानी तें त्याचें ह्मणणें कबूल केलें व बऱ्याच मोठ्या सैन्यानिशी शहाबुद्दीन लगेच स्वारी करण्यास निघाला. तो सिंधूतटाकावर सैन्यासह येऊन पोंचला, तेव्हा त्यानें निसुरतखानाबरोबर अमरासिंहाकडे असा निरोप धाडला कीं, तुझ्यापाशीं असलेली चित्ररेखा नावाची वेश्या जर तू दडादाखल मला अर्पण करीत असशील तर तुझें स्वातंत्र्य मी कबूल करीन. नाहीं तर लढायला सिद्ध हो शहाबुद्दीनाची प्रचंड सेना अगदीं उबऱ्याशी येऊन ठेपलेली पाहून अमरासिंह भयत्रस्त झाला व त्यानें शहाबुद्दीनाचा मांडलिकपणा स्वीकारला. मुसलमानी इतिहासात या राजाला अरबखान असें जरी ह्मटलें आहे तरी त्याच्या इतिहासावरून तो अस्सल आर्य क्षत्रिय अमरासिंह नावाचाच राजा होता हें सिद्ध होतें.



# तृतीय काण्ड.

## दरोडेखोर सरदार.

(श्लोकार्ध)

मारा ठार करा लुटारु अवघे घेऊनि खड्गां करीं ॥
भाले, तीर, कट्यारि चालवुनिया मारा अरी सत्वरी ॥

— सौमित्र.

इ. सन ११७० च्या सुमारास गख्खरांचें राज्य पेंढाऱ्यांप्रमाणें बरेंच त्रासदायक झालेलें होतें. त्या लोकांची सर्वत्र लूटफाट करण्याच्या घूमधडाका सुरू केला होता. आज येथें छापा घाल तेथें लूट कर असा त्या लोकांनीं सर्वत्र त्रास देण्याचा सुळसुळाट करून सोडला होता. ते लोक सुमारें दहाबारा हजार असून सर्व सशस्त्र होते. ते क्षत्रियाप्रमाणें यवनांनांही त्रास देण्यास कमी करीत नसत. मार्गे चालत असलेल्या सैन्यावरही ते छापे मारीत. त्यांना अर्धे हिंदु व अर्धे मुसलमान म्हटले तर कांहीं त्यांत अत्युक्ति होणार नाहीं. कारण की, पकडून नेलेल्या मुसलमानी स्त्रियांबरोबर सुद्धां ते लग्नें करीत असत व त्यांपासून होणाऱ्या संततीला ते गख्खर असेंच म्हणत. ते

लोक मंत्र, तंत्र, यंत्र, जंत्र वगैरेंचे प्रायः प्रयोग करीत असत. त्यांचे पुरोहित बहुतक हिंदूच असत. ते हिंदूपद्धतीनेंच विवाहादि कार्यें करीत राजपुतान्याच्या सरहद्दीवर या लोकांचा मोठा प्रभाव असे हे लोक कधीं कधीं मोठाल्या जमावानें एखाद्या राज्यावरही चाल करून जाऊन लूट मिळवून पळून जात असत. त्यांना शिक्षा लावण्यासाठी जर कोणी राजानें त्यांच्यावर स्वारी करण्याचें योजिलें, तर ते लगेच शेतकऱ्याचा पेशा स्वीकारून कांहीं काल छपून राहात व राजसैन्य निघून गेल्यावर पुन्हा आपला पेंढाऱ्याचा धंदा एकजुटीनें सुरू करीत. याप्रमाणे त्या गव्हाराचा सर्वत्र त्रास पसरलेला होता आसपासचीं राज्यें तर या लोकांना फारच भीत असत. हे लोक कुटुंबपरिवारासह व्यापाराच्या निमित्तानें दूर दूरच्या प्रांताच्या सफरी करीत. यांना व्यापारी, धनिक वगैरे लोक विशेषतः फार भीत असत. त्या लोकांचें राहण्याचें ठिकाण मोठें रमणीय व मनोहर असे. त्यांची वस्ती नेहमी पर्वताच्या कटिप्रदेशीं अशा साऱ्या तऱ्हेची असे कीं, त्यांचे आश्रम मन मानेल तेव्हां एका प्रहरात उजाड करून ते दुसरीकडे सहज सर्वस्वासह निघून जाऊं शकत. त्यांचे आश्रम साधे पण सुंदर असत. पर्वताच्या चारी बाजूनीं नद्यांचे प्रवाह वाहात असतील अशाच ठिकाणीं ते झोंपड्या बांधून रहात असत, याचें कारण असें कीं, नद्यांच्या पाण्यावर ते शेती व बागाईत जमीनी सहज करूं शकत. कोठें कोठें

तर त्या नद्यांचे संगम बनून सुंदर पुष्पाच्छादित सरोवरें बनलेली दिसत. अशा त्या सुंदर सरोरुहयुक्त सरोवरावरून वाहणारा कमलगंधयुक्त वारा सेवन करणारे ते लुटारू लोक किती धन्य होत बरें? कमलनालांचें कमलासह वाऱ्याच्या झोकानें डुलणें पाहण्याचें मनोहारी सौंदर्य त्या लोकांचे नेत्र नेहमी अनुभवित असल्या कारणानेंच त्यांची दृष्टी सदोदित द्रव्यापहारी बनलेली असावी असें ह्मणण्यास ते तयार असत. तशा त्या सरोवरातून एका विशेष तऱ्हेचे प्रवाह वाहात जाऊन अधेऱ्या गुहेत प्रविष्ट होत व पुन्हा बाहेर निघून मोठा घोर घों घों आवाज करीत तुटक्या कड्यावरून मैदानावर धबधब्याप्रमाणें आदळत असत अशा तऱ्हेचें त्यांचें तें अद्भुतपूर्व जलमय जलमंदीरच विधात्यानें त्यांच्यासाठीं निर्माण केलेलें असावें असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा त्या सुरक्षित व रम्य जागेंत ते गलबर लोक आपल्या बालकासह क्रीडा करीत असत. त्यांचीं मुलें पटांगणात नेहमी हात्यारांचे खेळ शिकत असत. तें शिक्षण त्यांना बाल्यावस्थेपासूनच प्राप्त होत असे आपल्या सैन्यानें चाल करून कसें जावें व बचाव करून लूट कशी करावी हेंही शिक्षण त्यांना देण्यात येत असें. ते जे नेहमीं पहाडाच्या उच्च शिखरावर दुर्गम अशा ठिकाणीं आक्रमण करीत असत. त्याचें कारण असें कीं, मोठाल्या किल्यांच्या तटांवर त्याना सहज चढून जाऊन तें हस्तगत करता यावेत. ते पर्वतावरील झाडांवरून चढून मनोहर फुलें व फळें नेहमी आणीत.

ते हिंस्रपशूंच्या शिकारी करीत, परंतु ते शाकाहारी असत. ते मांसाहारी पशूंपासून स्वतःच्या जीविताचें रक्षण मात्र करीत, परंतु मांसाहार करीत नसत. त्यांचे देह मजबूत व कटक असून उंचीही बरीच असे. ते आपल्या परिवारासह उघड्या मैदानात व खुल्या स्वच्छ हवेत राहात असत, म्हणून नेहमी निरोगी असत. त्यांचें लढाईचें शस्त्र अगदीं साधारण असे; तरी त्याच्या माऱ्यापुढें मोठालीं सैन्यें दम धरीत नसत. तें शस्त्र म्हणजे एक मोठें धनुष्य आणि बाण हें होय. त्यांच्या कमरेला एक ढालहि असे. पायांतील त्यांचे जोडे जवळ जवळ मारवाडी जोड्यासारखेच असत. फरक एवढाच कीं अग्रभागाला खिळे मारलेले असत. त्या खिळ्यांनी ते वाघासारख्या हिंस्र पशूंना घायाळ करीत. ते सुरा चालवण्यांत इतके पटाईत असत कीं, एका घावासरशी मोक्ष देत. त्यांची आक्रमण करण्याची पद्धतहि विचित्रच असे. ते एकजुटीनें प्रतिपक्षावर हल्ला करीत; परंतु पुन्हा फुटून अशी दौड मारीत कीं, त्यांच्याशीं एका जागेवर उभे राहून लढणें फार मुष्किलीचें होत असे. एखादी उमदी चीज हातीं लागल्यास घोड्यावर स्वार होऊन ते चटकन् दृष्टीआड निघून जात. लुटीच्या मालाचें रक्षण घरचीं मुलें करीत. प्रथम ते दुरूनच यात्रेकरी, पांथस्थ अथवा सैनिक यांना बाणांनीं घायाळ करून पाडीत. स्वतःच्या जीवावर बेतली तर धनुष्यबाण मुलांच्या स्वाधीन करून स्वतः घोड्यावर बसून पळून जात. त्यांच्या स्त्रियांनाहि

त्याचप्रमाणें शस्त्रास्त्रांची माहिती असे. राजसैनिकांनीं त्यांच्या वराद्यांना जर कधीं वेढा दिला, तर त्यांच्या स्त्रिया लढून आपल्या बालकांचें रक्षण करीत असत.

ते दुसऱ्यांच्या स्त्रियानाहि आपल्या घरीं बंदीवान करून ठेवीत असत. याचें प्रत्यंतर पाहणें असल्यास तो एका अबलेचा विलाप त्यांच्या एका झोंपडींतून ऐकू येतो आहे तिकडे लक्ष द्या! चौदापंधरा वर्षांची एक सुंदर युवती त्या झोंपडींत असून तिची दृष्टी समोरच्या मैदानावर खेळते आहे, पण तिच्या देहाला मात्र तेथें जाण्याची परवानगी नाहीं. तिच्या मुखकमलावरची झाक चिंताग्रस्ततेची आहे. ती क्षणांत अश्रुपात करते आहे व क्षणांत ते पदरानें पुसून टाकून जवळच्या बाग-काशीं बोलू लागते आहे. एके दिवशीं ती आपल्या झोंपडीच्या झरो-क्याजवळ येऊन मनाशीं विचार करू लागली कीं, "मी केवढी अभागी आहे! या दरोडेखोरांच्या मीं हस्तगत व्हावें ना? आतां त्यांच्या हातुन माझें रक्षणकर्ता परमेश्वराशिवाय कोण आहे! मीं कोणच्या जन्मीं पाप केलें होतें म्हणून, अशी येथें येऊन पडलें आहे बरें! माझा बाप खरोखरच वाईट मुहूर्तावर तीर्थयात्रेला निघाला, म्हणून हा वाटेंत असा प्रसंग आला. आई सुटली, बाप सुटला, भाऊ सुटला आणि बहीण सुटली; पण त्यांत माझा काय दोष? पण खरें पाहिलें तर याचें उत्तर मीच दिलें पाहिजे. मीच जर यात्रेला जाण्याचा आग्रह धरला नसता

तर बाप तरी कशाला निघता ! " अशा तऱ्हेचे मनोगत विचार करीत असता त्या बिचारीच्या डोळ्यातून एकदम अश्रुधारा वाहू लागल्या इतक्यात तेथें एक वृद्ध पुरुष येऊन तिला म्हणाला " चित्ररेखे, काळजी करू नकोस ! हें सर्व आमच्याच पापाचें फळ आहे पूर्वजन्मीच्या कृत्याचें फळ भोगलेंच पाहिजे "

चित्ररेखा—बाबा, या सर्व दुःखाच मूळ मीच आहे आपल्याला कनोजांत जें सुख मिळत असे तें या डोंगरात कसं बरं मिळणार !

या प्रमाणें मुलीचें व बापाचें संभाषण सुरू असता तेथें वृद्ध माता काठी टेंकीत आली व म्हणाली " चित्ररेखे, मला जरा धर ! मी खडकावरून घसरून पडलें आहे " मुलीनें व नवऱ्यानें तिला धरून बसविलें व बाप म्हणाला, " आता तुला बरं वाटतं का ? "

माता—मी जंगलातल्या झऱ्यावर पाणी आणायला गेलें होतें तेथे समोरच एक वाघ डुरकण्या फोडीत असलेला मीं बघितला. नशीब म्हणून तो तसाच निघून गेला नि मी वाचल्ये "

चित्ररेखेचा कंठ दाटून आला त्यांचें अशा तऱ्हेचें भाषण चाल असतां, दुसऱ्या बाजूकडून एक भीमकाय शस्त्रधारी आरडून बोलला कीं, " चपनलाल, तू मोठा बदमाष दिसतोस ! पळून जाण्याची युक्ती योजतो आहेस नाहीं का ? पण याद राख ! तुम्हां जर परवानगी शिवाय आपली जागा सोडून भलतीकडे जाशील, तर उभा चिरून टाकीन !

" नाहीं वर पुन्हा हलणार ! तुम्हाला विचारल्याशिवाय पुन्हां नेमून दिलेली जागा सोडणार नाही. "

या प्रमाणें बापानें नम्रपणानें दिलेलें उत्तर ऐकून चित्ररेखेचें हृदय भरून आलें तिनें आपलें अश्रु दाबून धरले तिच्या हृदयावर वज्राघात झाल्याप्रमाणें तिची स्थिति झाली. ती आपल्या मनाशी ह्मणाली " हायरे दैवा ! एका यःकश्चित भामट्या लुटारूच्यापुढें आज माझ्या बाबाना हात जोडण्याचा प्रसंग यावा ना ? 'सगळे दिवस सारखे नसतात' असें जें म्हणतात तें अगदी सत्य आहे "

" महाराज, सरदारसाहेब, " चपनलाल ह्मणाला " कृपा करून परमेश्वरासाठी तरी आम्हाला आता मुक्त करा ! तुमच्या मुला-बाळाचें कल्याण होईल तुमच्यावर लक्ष्मीची कृपादृष्टी होईल. तुम्हाला मोठ ऐश्वर्य प्राप्त होईल ! "

सरदार—चपनलाल, तुझं म्हणणं ठीक आहे; पण पैसा मिळाल्याशिवाय सुटका होणें कठीण आहे. ईश्वराच्या कृपेनं माझं ऐश्वर्य चोहोंकडून वाढतच आहे. माझ्या भयानं जयचंद, पृथ्वीराज यांनासुद्धां नेहमीं सैन्याची तयारी ठेवावी लागते. इतकेंच नव्हे तर सरहद्दीवरहि आह्मी एकदां असा धुडगुस उडवला होता कीं, शहाबुद्दीन घोरीलासुद्धां भरतभूमींत प्रवेश करण्याबद्दल शंका उत्पन्न झाली होती. आह्मी विनाकारण कोणासहि सतावीत नाहीं. आम्ही अभिमानाचं घर

खालीं करीत असतों. जयचंदाला, तर इतका अभिमान झाला आहे कीं, तो स्वताला भारतवर्षाचा साम्राटच समजू लागला आहे. याच साठीं आम्ही एकजूट करून त्याचा गर्वच्छेद करण्याची तयारी चालविली आहे. पृथ्वीराजाला आम्ही मुळींच त्रास देत नाहीं. उलट त्याला साह्य करायला आम्ही एका पायावर तयार असतों. त्याला आम्ही लढाईत रसद पुरवण्याचं काम करतों. अभिमानी जयचंदाला आमचा तिटकारा वाटतो. त्यानं आपल्या राज्यातल्या श्रीमंतांना असे चढवून ठेवले आहेत कीं, ते आपल्याला प्रति ईश्वराचे अवतारच समजतात." इतकें बोलून तो लुटारूंचा सरदार स्तब्ध झाला व कांहीं वेळानें पुन्हा, "धीर धर! तुमच्या संबधांनं विचार करण्यात येईल." असें बोलून लुटारूंचा तो मन्ना नावाचा सरदार तेथून चालता झाला व पुन्हा ती तिघेजण सुखदुःखाच्या गोष्टी बोलू लागलीं.



# चतुर्थ काण्ड.

## चपा व चमेली.

(गीति)

पुष्पानंतर वेली जिकडे तिकडे फलप्रसू होते।
कनकलता धारण करि फलयुगुलापाठुनीच पुष्पाते॥

—सौमित्र.

अमरसिंहाच्या उपवनाचें आजचें सौंदर्य काहीं विशेषच आहे. उपवनातील पदपथ माळ्यांनीं झाडून साफ केलेले आहेत. कांहीं झाडांवरून फुलें उमलताहेत व कांहींवरून वृक्षतळवळकाफंड गळून पडताहेत. चापा, जुई, मोगरा, चमेली, केतकी, वगैरे नानातऱ्हांच्या पुष्पांची सर्वत्र शोभा दिसत असून, त्यांचा मधुर गंध असा फैलावला आहे की, ज्यांच्या वासानें प्रमत्त झालेले भ्रमर आपल्या पंखांचा भन्न भन्न असा नाद करीत त्या फुलांवर उडून पुन्हा पुन्हा बसताहेत. ही वेळ प्रभातकाळच्या पूर्ण अमलाचीहि अद्यापी झालेली नव्हती. पूर्व दिशेला सूर्योदयाची पूर्व चिन्हें नुकतींच दृग्गोचर होऊं लागलीं होतीं. पक्षिगण कलरव करीत या वृक्षावरून त्या वृक्षावर उडू लागला आहे. त्यांचीं पिलेंहि त्यांच्यामागें चीं चीं, चूं चूं करीत पळताहेत, पण बिचारीं निराश होऊन परत घरट्यांत येऊन बसताहेत. पश्चिम दिशे-

कडे चद्रमा कांतीहीन होऊन मलिन दशेत दिसतो आहे. या ठिकाणीं प्रसिद्ध माघ कवीच्या पुढील वर्णनाची आठवण झाल्याशिवाया राहात नाही.

" आपली प्रियतमा जी पश्चिम दिशा तिला मलयज जो स्वच्छ चदन त्याच्या कुंकुमानें विभूषित करणारा हा चद्र चद्रं पक्व कमल-कन्दाच्या तुकड्याप्रमाणें गौरवर्ण किरणानी फारच शोभतो आहे ! "

सुदर सरसीरुहाचा समूह सरोवरांत प्रफुल्ल होऊ लागला. सूर्यकिरणें वृक्षांच्या पानांतील छिद्रांतून भूपृष्ठावर नाचू लागलीं. हींच किरणें जेव्हा हरित पुष्पपल्लवांवर पडतात तेव्हा त्याची शोभा दुणावते मदपवाचा प्रवाह सुरू होऊन—राजकुमारासह राजकुमारी त्या वाटिकेंत येऊ लागल्या आहेत. ती मडळी आपसांत गप्पा गोष्टी, थट्टा मस्करी करीत खिदळत पदपथांवरून चालली आहे. राजकुमारींच्या दासी त्यांच्या मागून मोठ्या सावधपणानें हिंडताहेत. केतकीच्या जवळ सर्पभीतीनें न जाण्याचा त्या त्यांना इषारा देताहेत. " सभाळा बर ! झाडाच्या खांदीला भुजंगाचा बळखा असेल ! " अशा तऱ्हेचे इषारे ऐकून त्यांना मोठें कौतुक वाटतें आहे, पण तें पारतंत्र्यांतलें आहे. त्यांनां स्वातंत्र्य हवें आहे म्हणून, त्या पाहा आपल्या म्हाताऱ्या दासीला थट्टेनें चिडवून बागेच्या बाहेर लावून देण्याच्या चेष्टा करीत आहेत. अखेर त्यांनीं आपल्या दासीला चिडवून तेथून पाय काढायला

लावलीच. आतां मात्र त्या राजकुमारी पूर्णपणें स्वतंत्र होऊन एकत्र जमल्यावर आपसात गप्पा गोष्टी—मोकळया मनानें करू लागल्या.

चपा चमेलीला म्हणते—" कायग चमेली, तू तर कायती माझ्यापेक्षा एकच वर्षानं लहान आहेस, पण माझ्यापेक्षा मोठी कशी दिसतेस ? " चमेलीनें तिला याचें असें उत्तर दिलें की, " चपे, तू नेहमीं मानासिक चिंतेत व्यग्र असतेस त्यामुळें खाल्ल अन्न तुझ्या अंगीं लागत नाहीं आणि म्हणून तू अशी काटकुळी दिसतेस ! " यावर केतकी म्हणते, " असं नाहीं. चपा आणि चमेली यात अतर मुळींच नाही असा माझा अनुभव आहे." चपाचमेलींनी तिला एक हलकेच थापड लगावली व जवळ ओढून तिला विचारिलें, " कायग, तुझ्या लग्नाच ठरल होत नि मग झाल नाही तें कुठें ? " याचें उत्तर केतकीनें असें दिलें की, " असं कस बर होईल ? मी तुम्हांला सोडून कशी जाऊं ? लग्नाच्या वेळीं मीं बाबाना सांगितल की, चपाचमेलीच्याच बरोबर मला द्या. हव तर त्याच्या दासाशीं माझ लग्न करून द्या. हें ऐकून बाबा बरेच रागावल नि ' तू आपला नवरा सोधून लग्न कर ' अस ते म्हणाले. आता काय ? मी स्वयंवर करणार ! " चपेनें यावर " स्वयंवराची गोष्ट ठीक आहे, पण पित्याचीहि आज्ञा मानण अवश्य आहे ! " असें जेव्हां म्हटलें तेव्हां " नाहीं कोण म्हणत ? पण आपला पति आपण निवडून काढण्यांत मात्र चूक न करण्याची खबर-

दारी घेतली पाहिजे. नाही तर पस्त्याव्याला कारण व्हायच ! " असें केनकीनें उद्गार काढले.

हें केनकीचें अमृतासारखें भाषण ऐकून चपा व चमेली यांनी एकमेकींकडे अशा काही कटाक्षानें निमिषार्ध पाहिलें की, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. त्या दोघींनीं स्वयवराची समति दिल्यावर चपा म्हणाली. " कायग केतकी, तू नाहरसिंहाशी लग्न करण्याच काग नाकारलस ? त्याच्यात तुला अवगुण ते काय दिसले ? "

केनकी—ते जरी दहा हजार सन्याचे अधिकारी आहेत तरी त्याच आचरण ठीक नाही ते आपल्या कामात इतका हलगर्जीपणा करतात की, त्याच मला वर्णनच करता येत नाही एकदा प्रजाजनात बडाळी माजली होती, तेव्हा ते दहा हजारी सेनापती असूनहि त्याच्यान ती मोडवली नाहीं. तिची शाती चदनासिंहानींच केली; पण ते एकटे काय करणार ? प्रजा शात झाल्यावर नाहरसिंहानीं कित्येक प्रजाजनांना नाहक ठार करून कित्येकांना सुळावर चढवल. त्याच ज्याच्या ज्यांच्याशीं म्हणून वैर होत त्या सगळ्यांचे त्यानी तीन तेरा न् नऊ बारा करून टाकले. हा का क्षात्रियधर्म झाला ? विपत्तीत पडलेल्या गोब्राह्मणांच रक्षण करण हेंच क्षात्रियाच खर कर्तव्य असतं.

चंपा—पण त्यांनीं तुला तर कांहीं त्रास दिला नाहीं ना !

केतकी—पण प्रजेला तर दिला ना? हाय हाय! त्या प्रसंगाला मी कधी कधीं म्हणून विसरणार नाहीं. एका विधवा स्त्रीनें राजवाड्यांत येऊन नाहरसिंहांच्या विरुद्ध केवढा आकांत केला होता! तिनें महाराजांपाशीं स्पष्ट सांगितलें कीं, आपल्या नवऱ्याचा कांही एक दोष नसतां खासगी द्वेषानें नाहरसिंहानीं त्याचे प्राण घेतले.

चमेली—मग आतां तू कोणाबरोबर लग्न करणार?

केतकी—एकतर चंदनसिंहासारख्या शूर वीर धर्मात्म्याला माळ घालीन, नाहींतर पृथ्वीराजाच्या खीची मांडलिकाला मी आपला गळेहार करीन

खीचींचें नाव केतकीनें उच्चारल्याबरोबर चमेलीचें मुखकमल म्लान झालेलें जरी केतकीच्या दृष्टीस पडलें, तरी ती मुग्धच राहिली. चमेलीनें मात्र तिला विचारलें कीं, "त्या सरदारांत विशेष असें काय आहे?"

केतकी—विशेष म्हटलें तर ते सौंदर्यांत कामदेवाप्रमाणें, शौर्यांत धनुर्धारी अर्जुनाच्या तोडीचे आणि धैर्य नि धर्म या बाबतींत तर प्रत्यक्ष हरिश्चंद्रच ते आहेत. त्यांनी केलेल्या प्रतिज्ञेपासून ते कधींच ढळत नाहींत.

चंपा—पाहा बरं! मी आतां एक गोष्ट सांगणार आहे. अगदीं गुप्त राहिली पाहिजे.

## चतुर्थ काण्ड.

केतकी---अगदीं गुप्त ठेवीन!

चंपा---केतकी, माझे तर प्राणाधार चंदनसिंहजी आहेत. मी जरी अजून त्याना वचन दिलेलं नाहीं तरी त्यांच्या दृष्टीवरून मी इतकं सांगू शकतें कीं त्यांना मी मनापासून आवडतें. एकदा मी गाडिझ्याहून घरी येत असतां, कांही लुटारूंनीं आम्हाला रस्त्यात गाठलं त्या वेळीं चंदनसिंहाजीनींच आमचं मोठ्या शौर्यानं संरक्षण केलं. शंभर शिपायांपैकीं फक्त चंदनसिंहजीच काय ते जिवंत राहिले. मी व चंदनसिंहजी अशीं दोघेंच गाडी जात असतां, माझ्या मनात असं आलं कीं, चंदनसिंहानीं जर आता माझ्यावर बलात्कार केला तर मी काय करणार! पण चमत्कार असा कीं, त्या शूरानं वर डोळा करून सुद्धा माझ्याकडं पाहिलं नाहीं. इतकंच नव्हे तर राजकुमारीला शोभेल अशाच रीतीनं त्यांनीं मला राजवाड्यात बाबांच्याकडे पोंचती केली. मी ही बाबाना आईला खरी खरी हकीकत स्पष्टपणें सांगितली. यावरच प्रसन्न होऊन बाबानीं त्याना सेनापतीचीं वस्त्रं अर्पण केलीं. चंदनसिंहजींचे ते उपकार मी कधींच विसरायची नाहीं. महात्मा मनूनं धर्माचीं जी दहा लक्षणं सांगितली आहेत तीं त्यांच्यात मला तर स्पष्ट दिसतात!

केतकी---तीं कोणचीं?

चंपा---धृतिःक्षमा दमोऽस्तेयं शौचं इंद्रिय निग्रहः।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥

मी तर चंदनसिंहजींनाच माळ घालणार ? बाबानीं नको म्हटलं तर मी त्याची समजूत काढीन.

इतके बोलून चंपा स्वस्थ बसली व चमेलीला चिमटा घेऊन म्हणाली—" चमेली, तू आतां सांग कोणाला वरणार तें।"

चमेली म्हणाली—" मी सांगेन, पण केतकीला तें आवडणार नाहीं "

यावर केतकी म्हणाली, " मला कां म्हणून बरं आवडणार नाहीं ? "

तेव्हा चमेली म्हणाली " मी चव्हाणांच्या रवीची सरदारावर मनापासून प्रेम करतें नि त्याच्याशींच लग्न लावण्याची प्रतिज्ञा केली आहे "

केतकी हें ऐकून हसली व म्हणाली " ही गोष्ट तर आधींच मी माझ्या सबधान सांगून चुकलें आहें. आता त्या गोष्टीत तुला बोलण्याचा अधिकार राहिलेला नाहीं. "

केतकीचें हें भाषण ऐकून चमेलीनें आपल्या डोळ्यांतून तडतडतोच अश्रूचे ठिपके गाळले. ते पाहून केतकी म्हणाली—" जाऊं दे ! ज्यात तुझं सुख त्यातच माझं सुख नि ज्यांत तुझं दुःख त्यांतच माझं दुःख ! मी दुसरा कोणी तरी वर पसंत करीन, पण एक गोष्ट मात्र पक्की लक्षांत ठेविली पाहिजे कीं, मीं तुमच्या बरोबर राहण्यासाठीं ज्या अर्थी नाहरसिंहाशी लग्न करण्याचं नाकारतें आहे त्या अर्थीं तुमचे तुमच्या

आवडीप्रमाणें विवाह झाल्यावर तुम्ही आपल्या पतींना त्याच्याचसारखा एखादा गुणवान् वरपुरुष माझ्याकरतां शोधून काढण्याची गळ घातली पाहिजे ! ”

“ यावर चंपा म्हणाली, “ केतकी, ही गोष्ट मी पुरी ध्यानांत ठेवीन बरं !”

त्या राजकुमारींच्या अशा तऱ्हेच्या गोष्टी आपसांत चालल्या असतां, तेथें त्यांची म्हातारी दासी काठी टेंकीत टेंकीत येऊन ह्मणाली कीं “ चला राणीवशांत तुम्हांला आतां घेऊन यायला सांगितलं आहे. ’

त्या म्हातारीला त्या मुली पुन्हां चिडवूं लागल्या ! ‘ म्हातार,’ त्या ह्मणाल्या—“ कुठें आहे तो खांदीवरचा भुजंग ? अजून कांहीं आम्हाला चावला नाही. ” म्हातारी दासी पुन्हा चिडलीव ते सारे ल्टाबर—पायांतील नूपुराचा छम् छम् आवाज करीत उपवनांतून राणीवशांत निघून गेले.



# पंचम काण्ड.

## विरही चंदनसिंह.

( गीति )

चातक स्वातिजलाला इच्छि मयूरी तशीच मोराला ।
वाञ्छी मी तव संगम कुमुदिनि जैशी सुरम्य चंद्राला ॥

—सौमित्र

"अहाहा! सुंदरीच्या पैंजणाचा तो छम् छम् नाद ह्या हृदयाला अक्षय जागृतींत ठेवतो आहे! परमेश्वरा, मी तिला प्रियसखे म्हणण्याचा दिवस कधीं बर उजाडेल? माझा निर्धार झाला आहे कीं, करीन लग्न तर त्याच प्रिय चंद्राननेशीं करीन नाहींतर आजन्म कुमारावस्थेंतच राहीन." शूर वीर चंदनसिंह अशा प्रकारचे विचार करीत करीत कालक्रमणा करीत असतां त्याचा वदनचंद्र दिवसें दिवस सूर्योदयसमयींच्या फटफटींत चंद्राप्रमाणें होत चालला होता. प्रेमचिंतेबरोबरच त्याला आणखीहि एका निराळ्याच चिंतेनें जरी व्याकूळ केलेला होता, तरी त्याच्या मनाला खरा हृद्रोग राजकन्या चंपाकुमारीच्या संगमसुखाचाच लागलेला होता! तो वारंवार आपल्या मनाशीं म्हणत असे कीं, "चंपा माझ्यावर खरं प्रेम करीत असेल का? तिला

'प्रिये' म्हणण्याचा मला अधिकार कधी मिळेल का?" एके दिवशीं चंदनसिंह अशाच प्रकारच्या विचारांत मग्न होऊन बाहेरच्या एका रम्य प्रदेशात हिंडत होता. तेथें तो पुन्हा पुन्हा स्वताशी म्हणे की, "बटिंडा संस्थानातून परत येत असतां त्या सुंदरी चंदेन दीर्घ सुस्कारा टाकून मला जें म्हटलें होतें कीं, 'तुम्हीं माझे प्राण आणि सतीत्व अशा जोडीच जें आज लुटारूच्या तडाक्यातून रक्षण केलं आहे तें मीं तुम्हांलाच अर्पण केलं आहे.' ते तिचे शब्द खरे होण्याचा कधी तरी योग येईल का? अहाहा! चंपेचे ते शब्द या हृदयावर किती तरी स्पष्टपणें लिहिले गेले आहेत! जगतात आशा ही एक मोठी चमत्कारिक चीज आहे! मोठाले राजेहि याच आशेच्या आसऱ्यानं केवढाल्या उलाढाली करतात! निर्धन लोक आशेनच जीविताचं रक्षण करतात! आशा नसेल तर प्राण्याचं जीवित अशक्य आहे! माझं हृदय तरी आशेनच भरून गेलेलं आहे! ती वेली हिरव्यागार पल्लवीन ओतप्रोत भरलेली आहे, पण अजून तिला फुलं येऊं लागायला अवकाश असल्यानं फलाशेवर थांबलंच पाहिजे! सौभाग्य पुष्पाच्या प्राप्तीवर फलाची आशा करायला काय हरकत आहे?" अशा तऱ्हेचे विचार करीत करीत चंदनसिंह त्या रम्य प्रदेशांतून बाहेर पडला. त्यानें पुन्हा एकदां त्या रम्य प्रदेशाकडे वळून पाहिलें व वेळ झाल्यास पुन्हां सायंकाळीं तेथेंच फिरायला येण्याचा

त्यानें मनाशीं बेत केला. चंदनसिंह तेथून घरी जों येउन पोंचला तों त्याच्या दरवाजापाशीं तिघे सैनिक उभे असलेले त्याला दिसले. त्यानीं त्याला मुजरा केला. चंदनसिंहानें एका आराम खुर्चीवर बसून " काय —कमी जास्ती आहे काय ? " म्हणून त्यांना प्रश्न केला. त्यानीं म्हटलें " अधिक कांहीं नाहीं, पण एका सैनिकानं सैन्यशिक्षणाच्या वेळीं उप-सेनाध्यक्षाचा अपमान केला इतकंच मात्र काय तें घडल ! " ' अप-मान ' हे शब्द ऐकून चंदनसिंहाचे रूपरंग बदललें. त्यानें लगेच विचारलें " कोणी अपमान केला ? " सैनिकांनीं मुजरा करून ' नाह-रसिंहान " असें सांगितलें.

नाहरसिंहाचें नांव ऐकताच चंदनसिंहाचा चेहरा क्रोधाविष्ट झाला. तो म्हणाला " काय, उपसेनाध्यक्षाचा अपमान करण्याइतकी त्याला घमंड चढली आहे काय ? ठीक आहे ! पाहून घेऊ ! तुम्ही जाऊन वीरसिंहांना माझा निरोप कळवा कीं, काळजी करू नका ! दुष्टाला योग्य शासन होईल. " इतकें बोलून चंदनसिंह आपल्या शयना-गारांत गेला. सैनिकही तेथून निघून वीरसिंहाकडे निरोप सांगायाला गेले. बिचाऱ्या चंदनसिंहाला एक चंपेची जी सध्यां काळजी होती तिच्यात आतां ह्या दुसऱ्या नाहरसिंहाच्या काळजीची भर पडली. तो बराच व्यथित झाला. तो स्वताशींच " नाहरसिंह, असं करणं तुला योग्य नव्हतं ! " असें म्हणून अंथरुणावर पडला. चंदनसिंह अशा तऱ्हेनें

चिंतामग्न झालेला असतां, तेथें एकाएकी एक दासी आली. तिला पाहून तो म्हणाला, "तुझा येथें येण्याचें काय कारण आहे?"

तिनें नम्रपणानें उत्तर दिलें "सेनापतीसाहेब, राजकुमारी चंपेनें हे पत्र दिलं आहे!"

"काय? पत्र दिलं आहे!" असा प्रश्न करून तो उठला त्यानें तें पत्र घेऊन फोडिलें. त्याबरोबर त्याची आशारूप वेल टवटवीत झाली. त्यानें दासीला जरा बाहेर उभें राहण्यास सांगून पत्र वाचण्यास आरंभ केला.

"माझे भावी पति चंदनसिंह!

बटिंडा संस्थानांतून येत असतां रस्त्यांत मी जें आपणास वचन दिलें होतें तें मी आमरण कायम ठेवणार आहें. त्या बाबतींत आपणहि माझ्याशीं तसें वागावें अशी प्रार्थना आहे! आपण क्षमा कराल तर एक गोष्ट आपणास लिहिण्याची परवानगी घेतें कीं, या जगांत पुरुष स्त्रियांस अनेक दोषांचें वसतीस्थान मानीत असतात, पण माझ्या अल्प बुद्धीला असें वाटतें कीं, स्त्रिया शीलस्वभावानें जितक्या चांगल्या असतात तितके पुरुष मात्र खास नसतात. आजपासून मी स्वखुषीनें आपणास माझे पति असें म्हणतें. यास्तव, आपणहि मला आपली धर्मपत्नी म्हणण्यास अनमान करूं नये, अशी विनंती आहे. आपणास आणखीहि एक गोष्ट अशी कळविण्याची परवानगी मागतें कीं, चमेली

व केतकी याच्या संबंधानेंही आपणास विसरता उपयोगी नाही. चमेलीनें, पृथ्वीराजाचे मांडलिक खीची सरदार याना वरण्याचा निर्धार केला असून, केतकीनें जर वीरसिंहाना पसंत केलं, तर त्या बाबतींत आपण जिम्मेदार झालें पाहिजे. वीरसिंहाजीचें मन आपण वळवालच. विशेष पुढील पत्रीं.

आपली दासी

चंपाकुमारी."

हें पत्र वाचून चंदनसिंहाचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्यानें दासीला बोलावून विचारलें "काय ग हें पत्र दुसर कोणी पाहिलं नाहीं ना?"

दासी म्हणाली— "नाहीं."

त्यावर चंदनसिंहानें दासीच्या हातावर एक मोहर ठेवून तिला बाहेर बसण्यास सांगितलें.

चंदनसिंह अंथरुणावर बसून मनाशीं नानाप्रकारचे विचार करू लागला. त्यानें ताबडतोब कलमदान घेऊन पत्र लिहिण्यास सुरवात करण्याचा विचार केला; पण पत्राच्या सुरवातीस आपल्या प्रियकरणीला मायना काय लिहावा या विचारात तो पुन्हा पडला. प्रिया लिहावें कि चंपाकुमारी लिहावें असा तो विचार करीत असता अखेरीस चंपाकुमारी असें लिहिलें तर ती रागावणार तर नाही ना असा विचार

जरी त्याच्या मनांत आला, तरी शेवटीं त्यानें चंपाकुमारी असेंच मायन्यान लिहिण्याचें ठाम ठरवून पत्र लिहिण्यास प्रारंभ केला.

"भावी धर्मपत्नी चंपाकुमारी,

आपलें पत्र पावलें. मजकूर समजला. माझ्यासारख्या एका अभागी व एका साधारण माणसावर आपली एवढी कृपा असलेली पाहून मला धन्यता वाटली. प्रिय चंपाकुमारी, प्रवासांत मी जें तुमचें रक्षण केलें तें केवळ माझें कर्तव्य समजून केलें. आपण जो पुरुषासंबंधाचा शेरा लिहिला आहे तो अक्षरशः खरा आहे. मीहि आजपासून प्रतिज्ञा करतों की, लग्न करीन तर तुमच्याशींच करीन; नाहीं तर आजन्म ब्रह्मचर्य धारण करीन. आपल्या पत्राप्रमाणें मी आपलें पतीपण जसें स्वीकारलें आहे तद्वतच आपणहि माझ्याशी पत्नीत्वाचा संबंध ठेवण्यास संकोच करणार नाहीं अशी मला आशा आहे. चमेली व केतकी याच्या बाबतींत आपल्या सूचनेप्रमाणें मी प्रयत्न करीन वीरसिंहाबद्दल जशी मी हमी घेऊं शकतों तशी मांडलिक रवीची मात्र घेऊं शकत नाहीं. आतां, अधिक लिहिण्यास वेळ नाहीं. कारण, नाहरसिंहानें छावणींत कांही गडबड केली आहे, यास्तव मी छावणींत जाण्यास घाईनें निघालों आहें.

आपला दास

चंदनसिंह सेनाध्यक्ष."

# चव्हाणी समशेर !

पत्र जलदीनें पाकिटांत घालून तें त्यानें दासीच्या हातीं दिलें व लगेच पुन्हां तिच्या हातावर एक मोहोर ठेवून तिला जाण्यास सांगितलें. दासी तेथून तावडतोब निघाली खरी, पण मार्गांत तिच्यावर जो एक प्रसंग गुदरला, तो मात्र मोठा हृदयविदारक होता. दासीच्या उलट दिशेकडून हलकट नाहरसिंह घोड्यावर बसून येत होता. त्या खुबसूरत दासीला पाहून त्याला मोह उत्पन्न झाला घोडा थांबवून तो खाली उतरला व त्यानें तिला बलात्कारानें घोड्यावर आपल्यापुढें बसवून, घोड्याला टांच मारली. ती जरी सोडण्यासाठी आकांत करीत होती, तरी त्याला तिची दया आली नाहीं त्यानें घोडा जोरानें हांकला. ती बिचारी दासी कुरंगीप्रमाणें विलाप करीत होती. मार्गांत दोघां पथिकांची तिनें प्रार्थना केली पण घोड्याच्या दवडीपुढें त्याचा इलाज चालला नाहीं शेवटीं ती ईश्वरास शरण जाऊन म्हणाली, “ देवा, परमेश्वरा, दीनदयाळा, आजपर्यंत जसा तू अनेक स्त्रियांचा मान राखला आहेस, तसाच माझा राखण्यासाठीं कां बर धावून येत नाहींस ? ” ती अशा रीतीनें देवाचा धांवा करीत असतां, तिला जनकनंदिनी सीताहरणाची आठवण झाली. सीतेनें जसे आपले दागिनें आपलें वल्कल फाडून त्याच्या चिंधींत बांधून हलकेंच रावणाला नकळत वाटेंत टाकून दिले होते त्याच प्रमाणें तिनें आपल्या जवळचें चंदनसिंहाचें पत्र मार्गांत, नाहरसिंहाला नकळत टाकून देण्याचा

विचार केला व लगेच तो अमलातही आणला. पत्र टाकतांना तिनें देवाची अशी प्रार्थना केली कीं, "देवा, हें पत्र चंदनसिंहाच्या शत्रूच्या हाती न पडू देण्याची कृपा कर!" घोडा मोठ्या वेगाने चालला होता. घर जवळ येत चाललें तेव्हां त्या नीच नाहरसिंहानें त्या दासीला विचारलें कीं, "कायग सुंदरी, तुला आतां इथें कोण सोडवायला येणार असेल त्याला बोलाव! तुझ्याशी मी लग्न करण्याचा विचार केला आहे."

त्यावर ती म्हणाली, "तुझ्यासारख्या माकडाची इच्छा देव कधींच पुरी करणार नाही. तुझ्यासारख्या अन्यायी नराधमाशीं कोणची स्त्री विवाह करील? पक्कें लक्षांत ठेव कीं तूं जो माझ्यावर बलात्कार केला आहेस त्याचा बदला तुला देव दिल्याशिवाय कधीच राहणार नाहीं."

यावर नाहरसिंह हसून म्हणाला "जेव्हां मिळायचा असेल तेव्हां मिळेल, पण सध्या तर आनंदी आनंद आहे ना? तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीचें मुखचुंबन करण्यांतच मी आपल्याला धन्य समजतों. घरां तल्या माझ्या दहा स्त्रियांच्या संख्येंत तुझी अकरावी संख्या झाली" दासी म्हणाली "नाहरसिंह, तूं क्षणिक सुखासाठी इतकें पातक कां करतोस? या पापाबद्दल तूं देवापुढें गेल्यावर काय उत्तर देशील? तूं कांही अमर नाहींस! रावणासारखा ईश्वराचा परमभक्तहि अमर

झाला नाही, मग तुझी काय किंमत! म्हणून, अजून तरी आपली वर्तणूक दुरुस्त कर, नाहीं तर तुझे हाल कुत्रा खाणार नाही."

नाहरसिंह निर्लज्जपणानें म्हणाला, "ते असू दे! परमार्थावर दृष्टी देणाऱ्यांना मी मूर्ख समजतों. खाव, प्यांव, मौज करावी—हा माझा सिद्धांत आहे"

त्याच्याशी वाद करणें निष्फल आहे असें समजून दासी जरा मुग्ध झाली तरी त्याची वटवट सुरूच होती थोड्याच अवधीत नाहर आपल्या घरच्या दारापाशीं येऊन थडकला. त्यानें द्वारापाशीं आल्याबरोबर "कुत्तू, फाटक उघड" असें मोठ्यानें म्हटलें. त्याबरोबर फाटक उघडलें जाऊन नाहरसिंहानें दासीसह आत प्रवेश केला.



# षष्ठ काण्ड.

## दुर्दैवी कुटुंब.



जातिर्यातु रसातलं गुणगणस्तस्याप्यधो गच्छतां—
च्छीलं शैलतटात्पतत्वभिजनः सन्दह्यतां वान्हिना
शौर्ये वैरिणि वज्रमांशु निपतत्त्वर्थोऽस्तु नः केवलं
येनेकेन विना गुणस्तृणलव प्रायाः समस्ता इमे ॥

—भर्तृहरि.

सायंकाळीं आरक्तवदनानें सूर्यराज क्षितिजांत उडी मारीत आहे. व्योमविहारी वृक्षावरून घिरट्या मारताहेत. त्यांचीं पिलें चूं चूं करून त्याच्यापाशीं पोटाला मागत आहेत. पण त्यांच्याकडे लक्ष न देता तो पक्षिगण आपल्या क्रीडेंत दंग होऊन राहिला आहे. एक दुसऱ्याला चोंचीनें टोंचतो आहे व त्याला तिसरा खालीं पाडण्यासाठीं त्यावर झडप मारतो आहे. चौथा फक्त भयच दाखवित आहे पण तेंहि दुरू-नच. कॉव कॉव, टॉव टॉव सुरू आहे. अशा समयीं सूर्यराजाचीं रक्तवर्ण किरणें वृक्षपल्लवींतून कमलवनाचें चुंबन करून माघारीं जात आहेत. किरणमाला कमलवनचुंबनानंतर पर्वत शिखरावर आरोहण करीत असतां,

दुसरीकडे नद्यांच्या प्रवाहांचा कलरव ऐकूं येतो आहे. त्या नद्यांच्या प्रवाहांतून लांकडाच्या सुंदर पल्लवयुक्त फांद्या वाहात चालल्या आहेत. नद्यांच्या तटांकावरून नानाप्रकारचीं पुष्पवृंदें फुलली आहेत व त्यावर मधुपाचा गुंजारव चालला आहे. अशोक, चांपे, मालती, जुई, चमेली, जाई वगैरेंचे घनदाट थवे सर्वत्र पसरले असल्याकारणानें तें स्थल तशा तऱ्हाच्या वृक्षलतांचे माहेरघरच दिसतें आहे. तें त्यांचें माहेरघर असें बनलेलें होतें कीं, त्याच्या छायेंत राहणाऱ्या प्राण्यांना सूर्यकिरणाचा तीव्रतर स्पर्श क्वचित होत नसे, कारण, वृक्षालतांची पल्लवी प्रखर सूर्यकिरणांना आपल्या पृष्ठभागाच्या ढालाच करून राहिली होती. त्या प्रांतात जिकडे दृष्टी फेंकावी तिकडे रमणीयतेचें मनोहर साम्राज्य दिसत होतें अशा स्थलीं पशूहि कांहीं वृक्षांना आपल्या शरीराच्या कंडूशमनार्थ घर्षण करून जातांना दिसत होते सिंह, भाल्लू, वाघ, चित्ते, लांडगे, मोर वगैरे अनेक प्राणी त्या रमणीय स्थलांत वास करीत होते एकंदरीत तें रान रमणीय व मनोहर होतें तरी निबिड असून भयानकहि होतें. असें जरी तें आरण्य होतें तरी परमात्म्याची लीला अगाध असल्यामुळें तेथेंहि मानवी वस्ती होतीच सभोंवार बऱ्याच झोपड्या विखुरलेल्या असून त्यात मानवी प्राणी वस्ती करून राहिलेले होते. वाचकहो, आपण मागें ज्या लुटारू लोकाच्या सरदाराची हकीकत वाचली आहे त्याच्याच झोंपडीजवळ आपण आतां आलेले आहोत हें

ध्यानात आणा ! कारण रानाचें वरील वर्णन—मागील वर्णनाचा राहि-लेला कांही भाग ह्या प्रकरणात दिलेला आहे. मागें जें हृदयविदारक चित्र आपण पाहिलें आहे त्याच्याच पुढची हकीकत आता आप-ल्याला येथें दिसणार आहे

मागें तृतीय काण्डात ज्या एका लुटारू सरदाराच्या हातांत सापडलेल्या एका दुर्दैवी कुटुंबासंबंधानें हकीकत आलेली आहे, त्याच कुटुंबाचें ह्या डोंगरी अरण्यात आता पुढें काय चाललें आहे तें पाहू. ते कुटुंब आपसांत आपल्या हातून पूर्वजन्मी जी पापें घडली त्याच प्रायश्चित्त सध्या भोगीत असल्याबद्दलचा तेथें अनेक तऱ्हेनें विचार करीत एकत्र बसलें होतें कुमारी चित्ररेखा आपल्या मनात म्हणत होती की, "या दुःखद प्रसंगाला मीच मूळ कारणीभूत आहें. बहुत-करून माझ्या स्वरूपावरच लुब्ध होऊन त्या डाकेखोरानें अह्माला येथें बंदीवान करून ठेवलं असलं पाहिजे. वेळ आली तर मी त्या डाकू सरदाराला असं सांगेन कीं, "अरे बाबा, तुझी इच्छा असेल, तर बेलाशक मला कैदेंत ठेव, पण माझ्या आईबापाना सोडून दे." असा विचार करून पुन्हा ती कांही वेळ स्तब्ध राहिली आणि पुन्हां मनाशी ह्मणू लागली कीं, "पण माझ्या वडलांना हा माझा विचार पसंत पडेल का ?"

असा विचार करून बिचारी चित्ररेखा जवळच्याच एका शिला-तलावर सचिंत बसली असता, तिचा बाप तिच्या जवळ जाऊन

तिला म्हणाला, " चित्ररेखे, विनाकारण दुःख करण्यात अर्थ काय! विधात्यानें जें लिहलं असेल तें भोगण प्राप्त आहे. हात जोडून गोड बोलण्याच्या विनतीपूर्वक शब्दानींहि जर त्या लुटारू सरदाराला कींव येत नाहीं तर कराव तरी काय ? आपण येथे आज दोन वर्षं या स्थितींत खितपत पडलों आहोंत, पण इथून मुक्त होण्याचा काहीच मार्ग सुचत नाहीं. "

जवळच असलेली वृद्ध माता म्हणाली, " या रानात आम्ही कुत्र्याच्या मौतीन मरणार असाच रंग दिसतो आहे. प्रारब्ध तरी किती जोरदार आहे! पहा कनौज त आमचा केवढा दरारा असे! पण इथें एखाद्या दरिद्री भिक्षुकापेक्षाहि आमची योग्यता कमी आहे. "

वृद्ध बाप रडत म्हणाला, " हरिरिच्छा बलीयसी ! " बापाला अश्रु ढाळतांना पाहून चित्ररेखा सद्गदित अंतःकरणानें म्हणाली, " बाबा, अश्रु गाळू नका ! थोडे दिवस दम धरा म्हणजे तुम्ही नेहमीचेच सुखी व्हाल. "

बापानें अश्रु पुशीत म्हटलें " मुली, माझ काय ? मी तर वृद्ध झालों आहें. काळजी काय ती तुझीच आहे! ज्या तुझ आम्ही पुष्पशय्येवर लालनपालन केल त्या तुला आज या फतराशीं टकरा खाव्या लागताहेत. एका भाकरीच्या तुकड्याला आम्ही महाग झालों आहोंत. देवा, तुझ्यान हें बघवत तरी कस ? सरदाराला

आचवलें, नात्यागोत्याला मुकलों व आता कनौज शहराचें तोंडहि दवण्याची आशा उरली नाही. तेव्हा आता बाकी ते काय राहिलें! येथें तरी काय? त्या लुटारूंच अपशब्द रोज निमुटपणें ऐकावे लागतात. प्रत्येक क्षण—पळानुपळ चिंतेत जात आहे मरण केव्हा येईल त्याचा नेम नाहीं "

अशा तऱ्हेने विलाप करीत असलेल्या आपल्या दुःखग्रस्त बापाला पाहून चित्ररेखा हात जोडून म्हणाली, "बाबा, मी एक विनंती करणार आहे पण तीच्याबद्दलच्या माझ्या धारिष्टाची आपण निंदा करूं नये."

पित्यानें गंभीर स्वरात म्हटलें "हो हो, बोल! तू आपला विचार मला सांगू नयेस तर कोणाला बरं सांगावा?"

चित्ररेखा म्हणाली—बाबा, या दुःखद प्रसंगाला सर्वस्वी मी कारण आहें! माझ्या रूपावर लुब्ध होऊनच त्या लुटारू सरदारनें आपल्यावर हा प्रसंग आणला असला पाहिजे!"

बापानें विचारलें "या तुझ्या बोलण्याचा तात्पर्यार्थ काय?"

चित्ररेखेनें लज्जायुक्त स्वरानें म्हटलें "माझ्याशीं विवाहसंबंध करण्यानें जर तुमची मुक्तता करायाला तो सरदार कबूल झाला तर काय हरकत आहे?"

अशा प्रकारचें आपल्या मुलीचें विनयपूर्ण भाषण ऐकून वृद्ध पिता क्षणैक मौन झाला, पण पुन्हां धीरानें बोलला, " मुली, मी या जगांतला आतां थोड्या दिवसांचा पाहुणा आहें ! आता दिसतों आहें उद्यां मृत होईन ! यासाठीं अल्पावधीच्या सुखाकरतां मी तुला नरकात कसा ढकलून देऊं ? ह तुझी इच्छाच असेल तर लग्न करून घे; पण एक खूणगांठ म्हणून लक्षांत ठेव कीं, ज्याच्यावर आपल मन बसेल त्याच्याशींच संबंध करावा; पण धन आणि वैभव यांवर लुब्ध होऊन मूर्खांची सगती कधीं करू नये. कारण तें खर वैभव नसून आमरण नरकात राहणंच असत ! यासाठीं माझ अस म्हणण आहे कीं, माझ्या सुटकेसाठीं तू आपलं व्यर्थ आत्मविसर्जन करूं नकोस ! तुझ्या विचाराबद्दल मी तुला धन्यवाद देतों. "

धन्यवाद देण्याच पुरेंहि झाले नाही तोंच वज्रवत् कठोर शब्द उच्चारीत तो दुष्ट लुटारू सरदार तेथें येऊन समोर उभा राहिला व म्हणाला, " कायर थेरड्या, अजूनहि तुझी रग जिरली नाहीं काय ? या लोडीबरोबर मी लग्न करण्याचं मनांत आणल तर तू मनाई करशील काय ? तुझी सारे तर माझे कैदी आहांत ! मला वाटेल तें तुमचं करता येईल ! "

हें भाषण ऐकतांच त्या वृद्धाच्या देहांतून जणू काय क्रोधवन्हीच्या ज्वालाच बाहेर पडू लागल्या. त्याचा चेहरा लालभडक होऊन डोळे

मदिरागाराप्रमाणें झाले. तो संतापानें म्हणाला, " अरे नीचा, नराधमा, व्यर्थ बडबड कशाला करतोस ? गरीबाचा व्यर्थ छळ करण्याची तुला लाज नाहीं वाटत ? तू मला काय मारणार ! माझा आत्मा अमर आहे. हें शरीर त्यानें परिधान केलेलं एक वस्त्र आहे."

वृद्धाच्या तोंडचे हे शब्द ऐकताच त्या क्रोधाविष्ट दुष्टानें त्याचे तावडतोब दोन तुकडे केले.

आपल्या पतीची ती स्थिती पाहून वृद्धा स्त्री म्हणाली, " अरे पापी चांडाळा, मलाहि मारून टाक ! " तावडतोब वृद्धाप्रमाणेंच तिचाहि शेवट करण्यात आला.

तो प्रकार पाहणें चित्ररेखेच्या आवाक्याबाहेरचें असल्यामुळें ती घेरी येऊन धाडकन पडली, पण लगेच शुद्धीवर येऊन म्हणाली, " मेल्या निर्दया, कारे फुकट एका गरीब कुटुंबाचा नाश केलास ! देव तुझा पुरा सत्यनाश करील ! " चित्ररेखा मोठ्यानें आक्रोश करूं लागली तोंच मागून कडाबिनीचा आवाज ऐकू आला. डाकू सरदारानें समोर दृष्टी टाकली तोंच समोरून तीनचारशें घोडेस्वार त्याच्याकडे दौडत येत असलेले त्यानें पाहिले व तो पळून जाण्याचा प्रयत्न करूं लागतो आहे तोच त्याच्या उजव्या पायात एक गोळी शिरून तो जमीनीवर पडला. त्याबरोबर त्यानें चित्ररेखेला आपल्या जवळ बोलावून ज्या तरवारीनें त्यानें तिच्या मातापित्यांचें तुकडे उडविले होते

त्याच त्याच्या तरवारीनें त्याला स्वतःला ठार करण्यास त्यानें तिला सांगितलें तेव्हा ती त्याला म्हणाली, " अरे पापिष्टा, चांडाळा " तू आमच्याशी जरी नीचपणा केला आहेस, तरी मी तुझ्याशी सद्भावानें वागतें. जा—मी तुला सोडून देतें ते इकडेच चाल करून येणारे घोडस्वार तुझ्या पापी कृत्याचें फळ देतील " चित्ररेखा इतकें बोलते आहे तोंच ती जागा चोंहोबाजूंना क्षत्रिय-घोडेस्वारांनी वेढली गेली. त्या सेनेचा नायक मोठा खूबसूरत असलेला चित्ररेखेच्या दृष्टीस पडला.

त्या सेनापतीनें चारीबाजूनीं ते स्थळ घेरल्यावर शान्तेचा ढोल वाजवण्याचा हुकूम दिला त्यावर शत्रूपक्षाकडून कांहींच उत्तर न मिळाल्यामुळें ते लोक लढण्यास तयार नाहींत अशी त्याची खात्री झाली तो घोड्यावरून उतरून चित्ररेखेजवळ आला व त्यानें तिला " देवी, तू अशा हीनावस्थेत कां आहेस ? तुझ्या दुःखाचें कारण काय आहे ? " असे दोन प्रश्न केले.

तेव्हा ती नम्रतेनें म्हणाली ' महाराज, मी गंधर्व जातीची असून कनौजाची राहणारी आहें गुजराथेंतल्या यात्रेसाठीं जात असतां आमची ही अशी दुर्दशा झाली आहे हा घायाळ होऊन पडलेला—हाच लुटारू सरदार मन्ना आहे. यानेच माझ्या मातापित्यांना ठार मारलें आहे. "

सेनापतीनें विचारलें, " तुझ्या मातापित्यांना मन्नानें कां ठार मारलें ? त्यांनी याचा काय अपराध केला होता ? "

ती म्हणाली, " महाराज, आम्ही त्रिवर्ग आमच्या सुखदु:खांचा विचार करीत बसलों असता, आमचं असं ठरत होतं की, जर या डाकू सरदाराशी मीं विवाह केला, तर हा माझ्या मातापित्याची सुटका करील किंवा कसं? आमचा हा विचार पुरा ठरतो आहे नाहीं तोंच या घातक्यानें माझ्या पित्याला कर्णकठोर भाषणानं संतप्त करून सोडल्यामुळे माझा बाप क्रोधाविष्ट झालेला पाहून त्यानें त्याला एकदम छाटून टाकला."

हें ऐकताच त्या तरुण सरदाराचें मुखकमल लालभडक झालें त्यानें त्या डाकूला विचारलें कीं, " काय रे डाकू, ही गोष्ट खरी आहे ना?"

त्यानें उत्तर दिलें, " अगदीं खरी आहे."

नंतर त्या तरुण सेनापतीनें त्या कुमारीला विचारलें, " हा डाकू तुझ्याशीं बलात्कारपूर्वक लग्न करणार होता काय?"

कुमारी म्हणाली " नाहीं. ही गोष्ट मी कधींच कबूल करणार नाहीं कारण कीं, त्यानं अद्यापी माझ्याकडे कधींच पापी दृष्टीनं बघितलेलं मला आठवत नाहीं."

कुमारी इतकें बोलतें आहे तोंच तो डाकू सरदार म्हणाला, " सेनापतीसाहेब, जन आणि जाति रसातळाला जावोत, जगताचे गुण त्याच्याहि खालीं बुडी मारोत, शील पर्वतावरून घसरून नष्ट होवो

किंवा शौर्यरूपी शत्रूवर आघात होतो, मला त्यापेक्षा इतर कशाकडेहि बघण्याची जरूरी नाहीं."

सेनापतीनें विचारलें, "द्रव्य काय तुझ्याबरोबर परलोकीं येणार आहे ?"

तो म्हणाला "तें परलोकीं न जाता येथेंच राहील ?"

तरुण सेनापतीनें म्हटलें, "मग त्याचा तुला काय उपयोग ?"

डाकू म्हणाला "मला त्याचा जरी कांही उपयोग नाहीं, तरी तें पृथ्वीराजाच्या सेनेच्या उपयोगी पडत."

पृथ्वीराजाचें नांव ऐकताच तो तरुण सेनापती मोठ्या अचंब्यात पडला. त्यानें मोठ्या गंभीरपणानें विचारलें, "पृथ्वीराजाचा आणि तुझा संबंध काय ?"

डाकूनें नम्रपणानें उत्तर दिलें कीं, "महाराज, मी क्रूर आणि कपटी डाकू नाहीं. मी आपल्या सरदाराच्या जमावांत इथें राहतों व ज्या वेळीं कोणी यवनांचें अथवा इतर शत्रूंचें पृथ्वीराजाशीं युद्ध जुंपतें त्या वेळीं वीस पंचवीस हजार लोकांनिशीं मी त्याच्या साह्याला धावून जातों."

सेनापती म्हणाला, "डाकूंचें साह्य घेण्यांत पृथ्वीराजाची बदनामी होत नाहीं काय ?"

डाकू म्हणाला, " राजाला मदत करणं आमचा धर्म आहे. आम्हा गव्खरांची मुलं, तरुण, वृद्ध व स्त्रिया पृथ्वीराजाकरता नेहमी मरणाला तयार असतात ! "

त्या डाकू सरदाराचे हे शब्द ऐकून तो सेनापती प्रसन्न चित्ताने आपल्या मनाशी विचार करू लागला की, " जंगली लोकसुद्धा पृथ्वीराजावर प्रेम करून त्याच्यासाठी मरणाला तयार असतात ना ? शाबास ! "

त्याने पुन्हा त्या घायाळाला विचारले, " असा तू थोर अन्तःकरणाचा असता, त्या दुर्दैवी दोघा वृद्धांना का ठार केलंस ? "

डाकू सरदार म्हणाला, " त्याचं कारण, ही माणसं जयचंदाची प्रजाजन होती. जयचंद आमच्या पृथ्वीराजाशी वैर करतो इतकंच नव्हे, तर तो पृथ्वीराजाला मदत करण्याऐवजी यवनांना साह्य करणार आहे असंहि आम्ही ऐकलं आहे ? "

तरुण सरदार म्हणाला, " मी जयचंदाचाच एक माणूस असून मी जर तुला या वेळी ठार केला तर तू काय करशील ? " डाकू म्हणाला, " तुम्ही मला मारलं तर माझे लोक त्याबद्दलचा सूड उगवण्यासाठी सर्व देशभर फारच हाहाःकार करून सोडतील ! हाहाःकार करणं तर दूरच राहिलं, पण आपण जर शांत उभे राहाल तर त्या लोकांची कृति आताच आपल्या दृष्टीस पडेल ! ते इतक्यात येथें येतील ! "

तरुण सरदार म्हणाला, " डाकू सरदार मी तुझ्या बोलण्यावर मोठा सुप्रसन्न झालों आहें माझें नाव मांडलिक खोची असें आहे. मी महाराज पृथ्वीराजाचा सामंत आहें माझ्या अधिकारांत नेहमीं पांच हजार सैनिक आज्ञातत्पर असतात मीही डाक्याच्या विभागाचा मालक आहें आतापर्यंत मीं दोनशें डाकेखोरांना गिरफदार केलें आहेत, पण तुझ्यासारखा शूरवीर डाकेखोर आजच मीं प्रथम पाहिला. माझी तुला अशी विनंती आहे कीं, तू हा डाकेखोरपणा सोडून देऊन जंगलविभागणीचा मालक व्हावें ! सध्या या देशांत कांहीं यवन डाकेखोर आले आहेत त्यांच्या पारिपत्याचा भार मीं आपल्या शिरावर घेतला आहे दैवयोगानें आता तुझी व माझी गांठ पडली आहे. हातीं घेतलेलें काम पार पाडण्यास मला आतां उशीर लागणार नाहीं. "

त्या डाकूशीं इतकें बोलून तो चित्ररेखेकडे वळून म्हणाला, ' देवी, धीर धर ! मीं आपल्या शिपायाकडून तुला सुखरूपपणें कनौजला पोंचवून देतों. "

डाकू म्हणाला, " चित्ररेखे, मी तुला त्रास दिला, तुझ्या मातापित्यांचा वध केला व तुझी सर्वस्वी अवाळ केली यापेक्षां अधिक पातक तें काय करणार ? मला त्या सर्वांबद्दल क्षमा कर ! अधिक मी आतां कांहीं बोलत नाहीं. "

इतकें बोलून तो रडू लागला तेव्हा ती म्हणाली "सरदार रडू नका! मी काहीं बोलत नाही. जें झाल तें कर्मधर्मसंयोगानं झाल आता इतउत्तर असें कर्म करू नका!"

हें भाषण चालू असता तेथें एकदम एक हजार डाकू, लोकाची टोळी येऊन थडकली त्यानीं आपल्या नग्या बरच्या खींची सरदारावर रोखल्या. घायाळ डाकूच्या हुकुमानें त्या त्यानीं परत म्यान केल्या खऱ्या; पण ते अश्चर्यमूढ झाले. मन्नानें त्याना जेव्हा सर्व हकीकत सांगितली तेव्हा ते प्रसन्नचित्त झाले. त्या सर्वांनीं ताबडतोब आपल्या मुख्याच्या औषधपाणी केलें सर्व गलबरानी आपापली घोडी बांधून ते आपापल्या मर्जीप्रमाणें इकडे तिकडे भटकायला गेले

थोड्या वेळानें रवींची सरदार म्हणाला, "आता मी जातो. प्रसंग पडल्यास मदत मागेन!"

मन्नानें घायाळ अवस्थेत पडल्या पडल्याच म्हटलें, 'रवींची सरदार, मला जर परमेश्वरानं या जखमेपासून वाचविले, तर मी कधी ना कधी तरी पृथ्वीराजाच्या कामीं उपयोगी पडेन!" तो बराच जबर घायाळ झाला असल्याकारणानें त्यानें इतकें बोलून क्षणमात्र आपले डोळे मिटले व थोड्या वेळानें डोळे उघडून तो पुन्हा म्हणाला, , रवींची सरदार, आता आपण जाव; पण शक्य असल्यास ह्या कुमारी-, लाही घेऊन जाव!"

मन्ना सरदाराचे हे शब्द ऐकून खीची सरदार बोलला "वीर-वर, हें तुम्हांला दुःख भोगण्याचें कारण मीच झालों, त्याबद्दल मला फार वाईट वाटत!"

मन्ना म्हणतो "जे काय व्हायच अस अदृष्टान ठरवलेलं असत ते घडलच पाहिजे! ते टाळता येण शक्य नाही. आतां कृपा करून या तरुणीला आपण आपल्या बरोबर घेऊन गेलांत तर माझा भार कमी होईल, अशी माझी आपल्याला विनति आहे."

इतकें बोलून तो चित्ररेखेला म्हणाला, "देवी, मी तुला फार दुःख दिल आहे, त्याबद्दल मला क्षमा कर! माझ्यापासून तुला झालेल्या दुःखाची परिस्फुटता कुठे करू नकोस अशी माझी तुला प्रार्थना आहे."

डाकू सरदाराने पुन्हा खीची सरदाराला म्हटलें, "आपण आता जाव व काम पडेल त्यावेळी मला इथेंच भेटाव!"

खीची सरदारालाहि जाण्याची घाईच होती. त्यानें निरोप घेऊन जाण्याची तयारी केली चित्ररेखाहि त्याच्याबरोबर जाण्यास सिद्ध झाली. तिच्यासाठीं एक घोडा तयार करण्यांत आला. घोड्याला पाहून ती खूष झाली त्याच्या पाठीवर थाप मारून तिनें त्याच्यावर आरोहण केले खीची सरदार व त्याचें सर्व लोक अश्वारोही झाले. ते चालूं

लागण्याच्या आधीं खीची सरदारानें व चित्ररेखेनें पुन्हां त्या डाकू सरदाराचा निरोप घेतला व नंतर त्या सर्व घोडेस्वारांनीं आनंदसूचक अशी जयघोषाची गर्जना करून आपला मार्ग धरला. घोडेस्वार वायुवेगानें आपापले घोडे दवडू लागले. ते कनौजच्या रस्त्यानें जात नसल्यामुळें चित्ररेखेनें खीची सरदाराला विचारलें कीं "आपण कुणीकडे चाललों आहोंत?"

खीचीनें उत्तर दिलें, "सिंधप्रांतातल्या अमरसिंहराजाकडे कराच्या वसुलीकरता आम्ही निघालों आहोंत. तुझी इच्छा तुझ्या देशीं जाण्याची असल्यास, शंभर स्वाराबरोबर रवानगी करतों."

ती म्हणाली—"महाराज, मी आतां कोणच्या तोंडानं कनौजला जाव? आपल्यापेक्षां कनोज आतां मला प्रिय वाटत नाहीं. आपण जाल तिकडच मीहि येतें!"

सरदार म्हणाला, "ठीक आहे!"

इतकें बोलून त्यानें आपल्या घोड्याचे वांकदोर ढीले केले व त्यामुळें त्याचेंच अनुकरण त्याच्या अनुयायांनीं केलें. थोडक्याच वेळांत ते सर्व घोडेस्वार त्या प्रांताच्या टप्प्याबाहेर गेले.



# सप्तम काण्ड.

## अत्याचार.

दुर्बलको न सताइये, जाकी मोटी हाय ।
मुई खाल की सांस ते, सार भसम हो जाय ॥
—कबीर.

नाहरसिहानें सुंदरी दासीला बलात्कारानें घोड्यावर घालून मोठ्या क्रूरपणानें आपल्या घरीं नेऊन ठेवली, हें पंचम काण्डाच्या शेवटीं वाचल्याचें वाचकांना स्मरत असेलच. त्यानें त्यानंतर तिच्याशीं कसें कठोरपणाचें वर्तन करून तिला बलात्कारानं आपली स्त्री बनविली हें आतां या काण्डात सांगावयाचें आहे. घराच्या दरवाजापाशीं नाहरसिहानें सुंदरी दासीला आपल्या घोड्यावरून उतरवून फुत्तूला हाक मारली व फाटक उघडून तो तिच्यासह आपल्या घरात प्रविष्ट झाला हें मागें सांगितलेंच आहे. ती जेव्हां त्या घरातील इतर स्त्रियांत जाऊन बसली तेव्हां त्यांच्याकडे पाहून तिचें हृदय जसें विव्हल झालें तशीच इचीहि स्थिति आमच्याच प्रमाणें आतां होणार असें जाणून त्या इतर स्त्रियाहि स्वगत हाय हाय करूं लागल्या! सुंदरीची कावरी बावरी

दृष्टी पाहून नाहरसिह्ह तिला म्हणाला, " अशी कावरी बावरी काय झाली आहेस? घराची मालकीण होणार ना? मी तर आतां तुला माझी पट्टराणी बनवणार आहे! "

' पट्टराणी ' हे शब्द ऐकताच इतर स्त्रियात कानगोष्टी सुरू झाल्या!

सुदरी दासी तात्काळ भुवया चढवून संतापानें म्हणाली, " अशा पट्टराणी बनणारीच तोंड काळ आणि तिला बनवणारा तर साक्षात् सैतानच! "

सुदरीच्या तोंडचें असें सर्वांसमक्ष अपमानकारक भाषण ऐकून नाहरसिहाचा क्रोध फारच भडकला. तो क्रोधानें म्हणाला—" अग डाकिणी, भेडावतेस कोणाला? तुझ्या अभिमानाच फळ तुला लवकरच मिळेल. " इतकें बोलून त्यानें तिला जबरदस्तीनें आपल्या अत:पुरात ओढीत नेलें.

अत:पुरात प्रवेश झाल्याबरोबर सुदरीच्या आश्चर्याला सीमाच उरली नाही. तिच्यापेक्षांहि सुंदर अशा शभर स्त्रिया तेथें तिच्या दृष्टीस पडल्या. त्यांच्याच प्रमाणें आपल्यास आतां बदिवासाचें दुःख भोगावें लागणार अशी त्यांची स्थिति पाहून तिची खात्री झाली.

ती अशा तऱ्हेच्या विचारात चूर असतां, नाहरसिह तिला दरडावून म्हणाला, " सुदरी, तुला याच्या प्रमाणें भुकेन मरण्याची इच्छा नसेल तर माझं खुशीनं पाणिग्रहण कर. "

सुंदरी रागानें बोलली—" निर्लज्जा, हें तू कोणापुढें बोलतो आहेस ! अशा दरडावणीन सती स्त्रिया भीत तर नाहींतच, पण त्यांच्यावर अशी विपत्ति कोसळली असतां, त्या अधिक दृढवत मात्र होतात."

नाहर संतापानें म्हणाला—" काय, तुला मरणाची भीती मुळींच वाटत नाहीं ? "

सुंदरीनें उत्तर दिलें, " भीति वाटणं जरी स्वाभाविक आहे, तरी आम्हा क्षत्रियांच्या मुलींना त्याची परवा न करणं हा आमचा स्वाभाविक धर्म आहे ! मी जरी कुमारी चंपेची दासी आहें, तरी विपत्तीत आपलं कसं रक्षण करावं हे मी आपल्या पित्यापाशी शिकलें आहे ! "

' रक्षण ' हें शब्द एकून नाहरसिंह हसला व इकडे तिकडे पाहून म्हणाला, " प्यारी, ही तुझी प्रस्तावना ठीक झाली. आता प्रेमानं पाणिग्रहण कर आणि विनाकारण होणाऱ्या त्रासातून मुक्त हो. "

सुंदरी म्हणाली " हे कष्ट अमृततुल्य असून ते मी आनंदानं सहन करीन. मी भुकेनं खुशीनं मरेन पण तुमचं पाणिग्रहण मात्र कधींच करणार नाहीं. "

सुंदरीचें हें उत्तर ऐकून नाहरसिंहानें हसत हसत तेथील स्त्रियांच्या हातांत हात घातला व तो महालाच्या वरच्या बाजूस गेला. वर जाऊन तो आवेशानें म्हणाला, " प्रथम पकडून आणल्यावर प्रत्येक

स्त्री असच ढोंग करते; पण मागून आपोआप धर्मपत्नी होण्याचं स्वेच्छेनं कबूल करते! असच ना?"

सर्व स्त्रियांनीं होस हो ठोकून दिल्यावर त्या मोठमोठ्याने हसूं लागल्या! नाहराने नंतर स्नान करून जलपान केल्यावर त्या स्त्रियांशीं थोडेसे हास्यविनोद केल्यानंतर तो सुंदरीपाशी आला व तिची समजूत करू लागला तिनें त्याची डाळ शिजू न देतां बरीच निंदा केली. तरी त्याने तिकडे दुर्लक्ष केल व हसत हंसत तो महालावर गेला. थोड्या वेळाने सायंकाळ झाला. बंदीगृहाला कुलूप लागल बाहेर त्याचे इतर साथीदार जमू लागले. थोड्याच वेळात शेंपन्नास लोक जमले काही वेळाने रात्रीने आपला पुरा अमल बसाविला. काही काळानें तेथें जमलेले त्याचे साथीदार आपापल्या घरी गेले. बंदीगृहात सुंदरीची स्थिति विचित्र झाली होती. सर्व दिवसभर थकलेल्या पोटात पाण्याचा एक थेंब किंवा अन्नाचा एक कणहि पडला नव्हता. अशा अवस्थेत तिची काय दशा झाली असेल त्याची वाचकांना पुरी कल्पना करता येईलच. हाय हाय! बिचारी भुकेने अगदीं व्याकूळ झाली होती. तिनें आपल्या बंदीगृहातील स्त्रियानां विचारलें "कायग बायांनो, तुम्ही सगळ्या माझ्या प्रमाणें भुकेलेल्या आहांत कांय?"

त्यांपैकीं एक म्हणाली, "नाही. आह्मांला दिवस आणि रात्र मिळून एकदां एक चपाती मिळते व पेलाभर पाणी आह्मी पितों!

त्यावर हें शरीर जगेल तोंपर्यंत जगेल! पण आता यापुढें दोन चार दिवसांपेक्षा अधिक जगण्याची मात्र आशा नाहीं."

हें उत्तर ऐकून सुंदरी जरी बरीच घाबरली तरी तिनें धीर धरून पुन्हा विचारलें कीं, "तुम्हांला कोणच्या नव्हेन पकडून आणलं तें तुम्हीं सांगाल का?"

सर्वांनीं हलके हलके उत्तर दिलं कीं, "बाई, ही वेळ बोलायची नाहीं. गप्प रहा. कारण, नाहर रात्रीं दारापाशीं येऊन आमचं बोलणं आडून ऐकतो! आह्मांला हें समजल्यापासून आह्मी भाषण वर्ज्य केलं आहे. त्यानं ऐकलं तर सकाळीं तो मागाच्या हवाली करतो"

सुंदरी म्हणाली "फारच बरं होईल. या दुःखांतून तरी सुटका होईल एकदाची."

इतक्यांत त्या स्त्रियांच्या कानावर पाय वाजल्याचा आवाज पडल्याबरोबर सर्वत्र चिपचाप झालें. सुंदरीच्या मनांत विचाराचा एकच कल्लोल सुरू झाला.

बंदीखान्यांतल्या स्त्रिया कांहीं काळपर्यंत गप्प बसल्या होत्या. पायाची चाहूल येण्याचें थांबल्यावर त्यांची भाषणें पुन्हा सुरू झालीं. त्या स्त्रिया जरी तोंडानीं बोलत होत्या, तरी त्यांचे कान बाहेरच्या पायांच्या चाहुलीकडे लागलेले होते.

सुंदरी म्हणाली—"कायग, इथून सुटका करून घेणं दुस्तर आहे का?"

# सप्तम काण्ड.

त्या स्त्रियांनीं धीरानें सांगितलें " अशा गोष्टी रात्रीं न करणच बर ! त्या दुष्टानें जर ऐकल तर जिवत राहण कठीण आहे ! "

स्त्रियांचें हें उत्तर ऐकून बिचारी सुदरी निराश झाली व मनाशीच म्हणाली, " देवा, हें कोणच्या पापाच फळ मिळत आहे ? पूर्वजन्मी मी अस कोणाला दुःख दिल होत कां, त्याच हे फळ मला मिळत आहे ? तें असो म्हणा ! पण चंदनसिंहाच्या पत्राच काय झाल असेल ? तो विचार मनांत आला म्हणजे काळीज दुभगून जात ! "

इतकें बोलून ती क्षणैक मुग्ध झाली, पण पुन्हां भांबावून बडबडू लागली " हाय ! चपा ! हाय ! चमेली ! आता तुमच दर्शन कस होणार ! माझी परत भेट न झाल्यामुळे तुमच्या मनात काय तर्कवितर्क उठत असतील बर ! खरोखर प्रेमापुढे–धन, राज्य, घर, ससार सर्व कांहीं तुच्छ असत ! चदनसिह जरी साधारण कुळांतला आहे, तरी त्याच रगरूप व शौर्य ही पाहून कुमारी चपेन त्यालाच आपला पति म्हटल ! "

अशा प्रकारची बडबड सुदरी आंत करीत होती व नाहर तें सर्व बाहेरून ऐकत होता. चपेच नांव ऐकल्याबरोबर त्याच्या मनांत मोठें कुतूहल उत्पन्न झालें व तो अधिक सावध चित्तान सुदरीची बडबड ऐकू लागला !

सुदरी बडबडतच होती. " काळाचा महिमा चमत्कारिक आहे ! राणीवशात राजकुमारीबरोबर विहार करणारी मी आज या बदीखान्यात

ण्डून भाकरीच्या एका तुकड्यालाहि महाग व्हावं काय ? हा नशीबाचाच फेरा खरा ! दु.ख येऊ लागलीं म्हणजे सर्व बाजूनीं येतात असं म्हणतात तें काही खोटं नाहीं. मला माझ्या जिवाची परवा वाटत नाहीं इतकी त्या पत्राची किंमत वाटते. देवाच्या कृपेनं तें बदमाषाच्या हातीं न पडो म्हणजे झाल ! ”

असले हे विचार सुंदरी जर स्वगत करती तर बरं झालं असत, पण दु खाच्या वेगानें भान न राहून ती ते सर्व मोठ्यानें बोलत असल्यामुळें नाहरसिंहाला स्वच्छपणें आइन ऐकू येत होते. ते विचार ऐकून नाहरसिंह आनंदानें फुलून गेला. त्यानें त्या भाषणावरून असा कयास बांधला कीं घोड्यावरून दौडत यताना सुंदरीनं तें पत्र रस्त्यात टाकून दिल असल पाहिजे. रात्र बरीच झाली असल्याकारणान तो तावडतोब जाऊ शकला नाहीं, पण रात्र संपताच नाहरसिंहानें आपल्या घोड्यावर आरूढ होऊन, तो ज्या रस्त्यानें सुंदरीला घेऊन आला होता, त्याच मार्गानें परत पत्राचा शोध करीत गेला.

प्रात:काळ झाला. सूर्य बराच वर आला. माध्यान्ह होत आली; पण जेव्हां पत्राचा शोध लागेना, तेव्हा तो रस्त झाडणाऱ्या मेहेतराच्या घराकडे गेला. झाडूवालीच्या घरापुढे उभा राहून, “धन्नई, धन्नई,” करून त्यानें हाका मारल्या. बाहेरून कोणी हांक मारीतें आहे असं ऐकून झाडूवाली बाहेर आली व हात जोडून बाजूला उभी राहिली. नाहरनें तिला रस्ता झाडताना एखादं पत्र सांपडल की काय म्हणून विचारल्यावर तिनें “नाहीं महाराज!” असें उत्तर दिलें.

नाहरनें तिला बरोबर चलण्यास सांगून पुन्हा रस्ताभर पत्राचा शोध केला; परतु व्यर्थ! नंतर नाहरनें तिला असें सांगितलें कीं, " पत्र सांपडून देशील तर तुला शभर मोहरा बक्षीस देईन."

मेहतराणी ( महारीण ) खूष होऊन म्हणाली, " सापडल्याबरोबर आपल्या पायापाशीं आणून हजर करीन. पत्रात काय आहे तें सागून ठेवल तर बर ' "

नाहर म्हणाला, " चपाकुमारीन चदनासिंहाला कांहीं मजकूर लिहिलेला आहे. सावधपणान शोध करून पत्र घेऊन ये ! "

इतकें सागून नाहरनें घरचा रस्ता तडक सुधारला. महारीणहि बक्षीसाच्या आशेनें रस्त्यातून इकडे तिकडे भटकत फीरू लागली.

नाहर घरीं आल्यावर पुन्हा सुदरीची समजूत करू लागला, पण तिन तिकडे मुळीच लक्ष दिलें नाही. ती आपल्याच विचारात गुग झाली होती. इतक्यात बाहेरून दोघा तिघा मित्र सैनिकानी हाका मारलेल्या, त्यानें ऐकल्या. तो लागलींच तेथून बाहेर आला. घोडा तयार होताच त्यावर स्वार झाला व ते सर्व दौडत रस्ता चालूं लागले. जाताना नाहर म्हणाला, " मला भीति काय ती फक्त चदनासिंहाचीच आहे ! सुदरीची हकीकत त्याला समजली नाहीं म्हणजे झाल ! "

त्यावर इतर मित्र सैनिकांनीं " कबूं या हो ! " असें म्हणून आपले घोडे दामटले.



# अष्टम काण्ड.

## तमांत महार.

( आर्या )

क्रोध कधीं न करावा कारण क्रोधांत पापबीज वसे.

—सभाविलास.

पृथ्वीराजाचा प्रताप दिवसेंदिवस भारतवर्षांत सर्वत्र फैलावूं लागला. वृद्ध, तरुण, बाल सर्व प्रतापी राजाकडे आश्चर्यचकित नजरेनें पाहूं लागलीं. शैशवाचा अभाव आणि यौवनाचा प्रभाव सर्व मनाला मोहून सोडूं लागला. पृथ्वीराजाचें साक्षात् मदोन्मत्त कमलनयनयुगुल, उज्वल मुखाकृति व भ्रमर गुंजारवाप्रमाणें वाणी हीं सर्वांना मोह पाडूं लागलीं. त्याच्या ऐश्वर्यवर्धनाबरोबर त्याच्या सरदाराचेंहि ऐश्वर्य वाढत होतें. भोंवतालच्या सादारांत पृथ्वीराज देवराज इंद्राप्रमाणें शोभूं लागला होता! सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, भारतवर्षांत पृथ्वीराजाची बढती सर्वत्र आनंदकारी झाली होती. पृथ्वीराज ज्या वेळीं अजमीरच्या गादीवर राज्य करीत होता त्या वेळीं गुजराथेंत भीमदेव राज्य करीत होता. तो इतका मोठा प्रतापशाली असून, राजनीतीतत्पर, कीर्तिमान, चतुर व

धुरंधर पंडित होता कीं, तो आपल्या सद्गुणानीं प्रजाजनांचा फारच आवडता झाला होता. तो प्रजेला इतका प्रिय झाला होता की, प्रजेनें त्याला 'भोलाराय भीमदेव' या पदवीनें विभूषित केलें होतें. त्याच्या सारंगदेव नावाच्या भावाला-प्रतापसिंह, अमरसिंह, वरसिंह, गोकुळदास, गोविंदराज, हरसिंह, श्यामसिंह, भगवानदास वगैरे नावाचे पुत्र होते. सारंगदेवाचा पुत्र प्रतापसिंह गादीवर बसल्यानंतर राजमदानें तो इतका बेहोष झाला कीं, सर्व प्रजेला त्याच्या कारकीर्दीपासून फार त्रास होऊं लागला. त्याच्या प्रजेला त्याच्यापासून जरी त्रास होत होता तरी तो भीमदेवाच्या राज्यांतहि लूटफाट करू लागला होता. आपल्या राज्यात प्रतापसिंहाची गडबड पाहून भीमदेवाला मोठें दुःख झालें. त्यानें सैन्य तयार करून प्रतापसिंहावर स्वारी केली. त्या युद्धांत एके दिवशीं भीमदेवाच्या पीलवानानें हत्तीला स्नानासाठीं नदीवर नेला असतां त्यावर सारंगदेवाच्या पुत्रानें हल्ला केला त्या हल्ल्यांत पीलवानासकट हत्ती मारला गेला. ही बातमी ऐकून भीमदेवाला फारच संताप आला.

भीमदेवाला बलशाली पाहून सारंगदेवाचे पुत्र पृथ्वीराजाला शरण गेले. शरणागताला आश्रय देऊन पृथ्वीराजानें, घोडा, शिरपाव जहागीर वगैरे दिलीं व आपल्या सामंतात त्यांस ठेवून घेतले. तेहि पृथ्वीराजापाशीं आनंदानें राहू लागले. त्यांची दरबारात नित्य हजेरी होऊं लागली. एके दिवशीं पृथ्वीराजाच्या बड्या राजसभेंत मोठमोठे सरदार येऊन

बसल्यावर भाटगण बिरुदावली म्हणू लागून पुरोहित आशीर्वचनें बोलूं लागले असता, सरदारहि परस्परांची मनोगतें परस्परांशी बोलू लागले.

पृथ्वीराजाच्या सभेंत मुख्य मुख्य सरदारांत मुख्य कन्हकाका, कौमाष, चंदावरदाई, गुरुराम पुरोहित, पीण पडिहार वगैरे होते कन्ह-काकांच्या समोरच सारंगदेवाच्या पुत्राच्या बैठकी होत्या. त्यांचा मोठा मान राखला जात असे. सभा भरल्यावर भाटानें बिरुदावली म्हणणें सुरू केली असतां, सारंगदेवाच्या ज्येष्ठ प्रतापसिंह पुत्रासबधानेंहि मोठी किर्ती गाण्याची सुरवात केली. त्याबरोबर पृथ्वीराजाच्या सामंत सरदारांत खळबळाट उडून त्यांनीं आपल्या समशेरी उपसल्या. तें पाहून सारंगदेवाच्या पुत्रांनीहि आपल्या तलवारी उपसल्या. द्वंद्वयुद्धाला आरंभ झाला. तरवारीला तरवार भिडली. हिंस्रपशूप्रमाणें क्षात्रियगण परस्पर झगडूं लागले. त्याचें अपूर्व वर्णन रासनामक ग्रथांत पुढीलप्रमाणें दिलें आहे:—

"एके दिवशीं पृथ्वीराजानें आपल्या रणशूर सामंताचा जंगी दर-बार भरविला होता. कन्हाच्या समोर प्रतापसिंह व त्याचे धाकटे भाऊ बसले होते. भर दरबारांत प्रतापसिंहानें आपल्या मिशीला पीळ भरलेला पाहून, कन्हाला तें सहन झालें नाहीं. त्यानें त्याचें कारण न विचारतांच एकदम समशेरीनें जागच्या जागीं त्याचे दोन तुकडे केले. वडील भावाची ती स्थिति पाहून अमरसिंहानें संतापानें कन्हाच्या डाव्या हातावर

चार केला. त्याबरोबर कन्हाच्या क्रोधाग्नींत घृत पडल्यासारखें होऊन त्यानें अमरसिंहाचा मस्तक पकडला व त्याचा मेंदू फोडून बाहेर पाडला. त्याच सपाट्यांत हरीसिंहहि मारला गेला. नरसिंहानें कन्हावर झडप मारली, पण तोहि तात्काळ यमसदनीं गेला. हा प्रकार पाहून पृथ्वीराज भर दरबारांतून उठून चालता झाला; पण इकडे घोर समर माजून राहिलें. शूरवीर कैमाषानेंहि कन्हाची मदत केली. साती भाऊ मारले गेल्यावर त्यांचा एक माधव नावाचा जो खास सेवक तेथें शिल्लक राहिला होता त्यानें आपली समशेर उपसून कन्हावर चाल केली; पण तोहि मारला गेला. इकडे अजमेरांत घरोघर अशी बातमी पसरली कीं, आज भरदरबारांत कन्हानें चालुक्याचे सात भाऊ मारून टाकले. ही बातमी प्रतापसिंहाच्या लष्करांत जाऊन पोंचल्याबरोबर तें लष्कर तसेंच महालापर्यंत धावून आलें. तेथें कन्हाची फौज सज्ज होती त्या दोन्ही फौजांत जंगी लढाई सुरू झाली. कन्हाच्या शिपायां-बरोबर ते स्वामीकार्यपरायण चालुक्य सैनिक जरी मोठ्या निकरानें लढत होते तरी अखेरीस ते पतंगाप्रमाणें रणयज्ञांतील ज्वालांत नाश पावले. बघतां बघतां ती आनंदपूर्ण रंगभूमी करुणपूर्ण बनली. तें युद्ध सायंकाळपर्यंत चालू होतें. शेवटीं कन्हाला जरी विजयश्रीनें माळ घातली व तो आनंदोत्कर्षानें स्वगृहीं गेला, तरी पृथ्वीराजाच्या मनाला तो प्रकार आवडला नाहीं. निष्प्रयोजन बखेडा माजल्यानें पृथ्वीराजाचें मन फारच

उद्विग्न झालें. कन्हानें जेव्हां ऐकलें कीं, पृथ्वीराज आपल्यावर कोपायमान झाला आहे, तेव्हां दरबारांत जाणें येणें त्यानें आपण होऊनच बद केलें.

कन्ह जेव्हां लागोपाठ सात दिवस दरबारात गेला नाहीं तेव्हा पृथ्वीराजानें आपल्या कर्मचारी नांवाच्या प्रधानाला पाठवून त्याला दरबारांत बोलावून आणविलें व विचारलें कीं, " कन्हराज, आपल्या मनाशीं विचार करा कीं, जगांत लोक आपल्याला काय म्हणतील ! ते असं म्हणतील कीं, चव्हाणांनीं चालुक्यांना दरबारांत बोलावून आणून त्याचा वध केला त्याचें सर्व यशापयश आपलें आहे माझं काय आहे ! मी तर बच्चा आहें. "

यावर कन्हानें असें उत्तर दिलें कीं, " काय वाटेल तें झालें तरी माझ्यां देखत कोणी मिशीवर ताव दिलेला मला कधीच सहन होणार नाहीं. "

पृथ्वीराज यावर बोलला कीं, " तर मग आपण आपल्या डोळ्यावर पट्टा बांधलेला बरा. "

इतकें बोलून पृथ्वीराजानें, पचवीसहजार रुपये किमतीचा एक-वीस टाक वजनाचा रत्नजडित सुवर्णपट्टा स्वहस्तें कन्हाच्या नेत्रयुगुलांवर बांधला त्या दिवसापासून तो पट्टा रात्रदिवस त्याच्या नेत्रावर बांधलेला असे. फक्त रात्रीं शयनागारात व युद्धसमयीं मात्र तो संपूर्ण सोडला जाई त्रेतायुगांत रावण व द्वापरात असे भीष्मद्रोणाचार्य तसा कालि-

युगांत पृथ्वीराजाच्या कारकीर्दींत कन्ह हा योद्धा होता. सिंह सिंहिणी-वर तुटून पडतो, तद्वत् तो शत्रूवर तुटून पडत असे. पृथ्वीराजाच्या रक्षणासाठीं दुर्योधनाचाच तो अवतार होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्येक प्रसंगीं कन्हानें मोठा अद्वितीय पराक्रम गाजविलेला आहे. प्रतापसिंहादि साती भावानां ठार मारल्याची बातमी जेव्हां गुजराथेंत भीमदेवाला समजली, तेव्हां भ्रातृस्नेहानें व्याकूल होऊन त्याचा क्रोधाग्नि भडकला व त्यानें तात्काळ पृथ्वीराजाला क्रोधानें एक पत्र लिहिलें कीं, " तुम्ही माझ्या भावांनां व्यर्थ मारलें आहे. त्याचा सूड मी घेणार आहें. सावध असा ! "

त्याचें उत्तर पृथ्वीराजानें असें धाडिलें कीं, " मी नेहमी सावधच आहे. आपली इच्छा असेल तेव्हा चालून या. "

हें उत्तर वाचून चालुक्य राजानें तावडतोब जरी अजमेरावर चाल करून जाण्यास आपल्या सेनेस आज्ञा दिली तरी तो वर्षाकाल असल्यामुळें राजमंत्र्यांनीं, त्या वेळीं चढाई करून जाणें इष्ट नाही अशी मसलत देऊन स्वारीचा बेत फिरविला.

भारतवर्षीय प्राचीन शूरवीरात एक मोठा अवगुण होता. रामायण आणि महाभारतकालीन शूरवीरांत विवेकानें विचार करून, समयानुरोधानें कोणची गोष्ट करावी व कोणची न करावी हा जो सद्गुण होता तो पुढें पार लोपून गेला होता. त्यामुळें अनेक प्रसंगीं

मोठाल्या हानी व्यर्थ झाल्याची इतिहास साक्ष देतो आहे. शिशुपालानें भर सभेंत श्रीकृष्णाची निंदा केल्यावर श्रीकृष्णानें किती तरी गम खाऊन अखेरीस त्याचा वध केला. मध्यमकालांत एका जाटाचें व एका शेतकऱ्याचें युद्ध झालें. कोणीच कोणास जिंकीना; तेंव्हा शेतकरी म्हणाला, " जो आपल्या हातानें आपल्या घराला आग लावील त्याचा विजय झाला असें मी समजेन." जाटानें तावडतोब आपल्या घराला आग लावली शेतकऱ्यानें त्याचा विजय कबूल केला. कन्ह पराक्रमी खरा पण वरील जाटाप्रमाणें पक्का अविचारी होता. त्याच्या अविचारी वर्तनानेंच पुढें त्याचा नाश कसा झाला तें योग्य स्थळी वाचकास वाचावयास सांपडेल.



# नवम काण्ड.

## इच्छिनीची इच्छा !

(वसन्ततिलका)

साझें समागमि च प्रेम असे च सारे ।
त्याच्याविणे सजासि कांहि सुचे न बारे ॥
यासाठि माते प्रिय दर्शनाते ।
येवो प्रिया ती मम सन्मुखाते ॥

—सौमित्र.

मागील काण्डांत सांगितल्याप्रमाणें सारंगदेवाच्या सात पुत्रांची कत्तल झाली त्या, वेळीं भोलाराम भीमदेवाचा प्रताप वाढू लागला होता. त्याच्या आसपासचे राजे त्याच्या तलवारीच्या प्रखर धारेला नम्र झाले होते. हा राजा मोठा नीतिमान असून राजाचे सर्व गुण जरी त्याला शोभवीत होते, तरी त्याच्या अंगीं एक मोठा दुर्गुण होता. तो मोठा कामलोलुप होता. त्याच्या राणीवशांत जरी एकशें एक स्त्रिया होत्या, तरी त्यानें जर एखाद्या सुंदर स्त्रीचें वर्णन ऐकलें, तर तो लगेच लाळ घेटूं लागे. तो त्या स्त्रीच्या अभिलाषानें तिच्या प्राप्त्यर्थ हव्या त्या खटपटी करीत असे. अभीष्टसिद्ध्यर्थ तो हवा तो उपाय योजी. भोलाभीमरायानें,

अबूगडचा राजा सरूप पवार यांच्या मंदोदरी नामक ज्येष्ठ कन्येचें जरी पाणिग्रहण केलें होतें, तरी दासदासींकडून तिच्या इच्छिनीकुमारी नामक बहिणीच्या सौंदर्याची प्रशंसा ऐकून तीहि आपल्या हस्तगत करून घेण्यास तो तयार झाला.

एके दिवशीं तो राणीवशांत गप्पागोष्टी करीत बसला असता त्यानें आपल्या पुरोहिताच्या स्त्रीच्या तोंडून जेव्हां असें ऐकलें कीं, " इच्छिनीकुमारी सध्या पूर्ण यौवनावस्थेंत असून तिच्या अंगाअंगातून अनंगानं संचार केला असल्यामुळें ती अप्सरानाहि तुच्छ मानते आहे. तिचा सुंदर केशकलाप आणि रमणीय मुखकमल ज्याच्या दृष्टीस पडलें तो मोहसमूढ झाल्याशिवाय रहात नाहीं. गुजराथेंत तिचे सौंदर्य जिंकणारी एकहि स्त्री नाहीं. ती जर ह्या राणीवशात आली तर याचें सौंदर्य खचीत वाढेल ! "

पुरोहितिणीच्या तोंडचें हें वर्णन ऐकून भीमदेव कामपीडित झाला व तो रात्रंदिवस तिच्या प्राप्तीच्या चिंतेत निमग्न होऊन, त्या इच्छिनी कुमारीची तसबीर सदोदित आपल्या नेत्रापुढें ठेवू लागला. त्या बाबतींत तो वेडेवेडे चाराहि करू लागला.

इच्छिनीकुमारीच्या पित्यानें तिच्या बाल्यावस्थेपासूनच तिच्या विवाहासंबधीं पृथ्वीराज चव्हाणाशीं वाङ्निश्चय केलेला होता. ही गोष्ट भीमदेवाला माहीत असताहि त्यानें तिच्या प्राप्त्यर्थ उद्योग चालविला

होता. भीमदेवानें आपल्या प्रधानाबरोबर त्या बाबतीत अबूगडच्या राजाकडे पत्र धाडलें. त्या पत्रात असा मजकूर होता की, ' आपली सर्वांत धाकटी कन्या जी इच्छिनी कुमारी तिचा माझ्याशीं विवाह करून द्यावा. पृथ्वीराजाला जरी आपलें वचन गेलेलें असलें, तरी ते माघारें घ्यावें. तसें जर आपण न कराल, तर मी ससैन्य येऊन अबुगडाचा विध्वंस करीन आणि इच्छिनीला बलात्कारानें घेऊन जाईन. '

हें पत्र घेऊन प्रधान अबूगडच्या राजदरबारात प्रविष्ट झाला. पत्र वाचून पाहिल्यावर सलप पवाराचा क्रोधाग्नि भडकला. त्याचे नेत्र लाल झाले. छाती तटाटून बाहू स्फुरण पावू लागले. त्या पत्राकडे दांत खाऊन तो तिरस्कारपूर्वक म्हणाला, " भीमदेवाचा हा निव्वळ अन्याय आहे! माझी ज्येष्ठ कन्या मदोदरी देऊन भीमदेवाशीं नात्याचा संबध जरी जोडला आहे, तरी इच्छनीच्या बाबतींत वाङ्निश्चय केलेला नाहीं. इच्छिनीच्या स्वरूपावर लुब्ध होऊन तिची मागणी करणं हा न्याय कोठला ? मीं इच्छिनीच्या बाबतींत पृथ्वीराजाला वचन दिलें आहे. तें आतां मला माघारें घेतां येत नाहीं. क्षात्रिय वचनांत पालट करीत नसतात. "

इच्छिनीच्या जैतसिंहनामक भावाचाहि क्रोध, तें पत्र ऐकून चढला. त्यानें आपली समशेर म्यानाबाहेर खेंचून तो भीदेवाच्या प्रधा-नाला म्हणाला " प्रधानजी, भीमदेवाला बुद्धिभ्रंश तर झाला नाहीं ना ?

तो अनीतीच्या बलात्कारानं विवाह करूं पाहतो आहे काय ? तो अर्थ अमरसिंहाच्या बलावर या घमेंडीच्या गोष्टी सांगत असेल, तर त्याला म्हणावं कीं, अशा धाकदपटशाहीच्या पत्राची इथें मुळींच डाळ शिज-णार नाहीं."

जैतरायाचा असा हा खडखडीत जबाब ऐकून भीमदेवाच्या प्रधानाच्यानेंही बोलल्याशिवाय राहवले नाहीं. तोहि एका प्रभावशाली राजाचाच प्रधान होता. त्याला जैतरायाचें भाषण सहन न झाल्यामुळें तो म्हणाला, "जैतराय, तूं अजून बच्चा आहेस! तुला भीमदेवाच्या वैभवाची कल्पना नाहीं. भीमदेवाच्या प्रतापाची तुलना तुझ्यासारख्या लाडांत वाढलेल्या राजपुत्राला करतां येणं शक्य नाहीं. भीमदेवाचा खजिना आणि सैन्य यांची यत्किंचितही तुला कल्पना असणं शक्य नाहीं. क्षणमात्रांत अत्यंत अवघड गोष्ट ते हस्तगत करू शकतात. त्याच्या क्रोधरूप अग्नीपुढें धरण्याची टिकाव खोणाची मजल आहे!"

सलप पवाराच्या देखत उच्चारल्या गेलेल्या या भाषणानें त्याच्या सामंतांनां फारच वाईट वाटलें; परंतु ते सर्व राजाच्या नेत्रसंकेतानें जागच्याजागीं स्वस्थ बसले. सलप पवार स्वतां म्हणाला, "प्रधानजी, आपलं म्हणणं जरी खरं असलं, तरी आमचा साह्यकर्ता श्रीकृष्ण मुरारी आहे हें ध्यानांत ठेवा. आम्ही त्याच दीनानाथाच्या पूर्ण भर-वशावर विश्वासून आहोंत. तोच आमचा सर्वस्वी त्राता आहे!"

# नवम काण्ड.

राजा सलप पवाराचें हें भाषण ऐकून भीमदेवाचा प्रधान जरी क्षणैक गप्प बसला, तरी तो पुन्हां बोलला कीं, " पवारजी, आपण यावेळी जरासा विचार करून वर्तन करावें ! सबद मिळाली नाहीं तरी अर्धीला न सोडणाऱ्यालाच बुद्धिवान् म्हणतात. एक कन्या दान न देण्यानें सर्व राज्य गमावणं आपल्याला संमत आहे काय ? माझ्यासारख्या वृद्ध मंत्र्याचा उपदेश ऐका आणि मागणीप्रमाणें कन्यादान करा ! यांतच तुमचं कल्याण आहे. "

इतकें बोलून भीमदेवाचा प्रधान चालू लागला व जातां जातां म्हणाला, " आतां आपल्याला आपल्या देहासह इच्छिनीला रणभूमींतूनच नेण्यांत येईल ! "

याप्रमाणें भीमदेवाचा प्रधान रागानें निघून गेल्यावर राजा सलप पवारानें इच्छिनीच्या लग्नाची झटपट तयारी करून, घडलेली ती सर्व हकीकत आपल्या दूताकडून पृथ्वीराजाच्या कानांवर घातली. पृथ्वीराजानें सलप पवाराच्या दूताचा मोठा आदरसत्कार केला. त्याला दहा घोडे आणि पांचहजार मोहरा व अनेक भरजरी वस्त्रेंभूषणें अर्पण केली. दूत निघून परत गेल्यावर पृथ्वीराजानें कैमासाला बोलावून आणून तावडतोब ससैन्य अबूगडाकडे निघण्याची तयारी करण्यास सांगितलें, त्याप्रमाणें सर्व सैन्य तयार झालें. थोड्क्याच दिवसांत पृथ्वीराज ससैन्य अबूगडावर जाऊन पोंचला. ही बातमी भीमदेवाला समजतांच त्याच्या

कोधाग्नी शिखरास जाऊन पोंचला. त्यानेंहि आपल्या सैन्याची जमवाजमव करण्याची सुरवात करून, पृथ्वीराजाला पत्रद्वारें असें समजाविलें कीं, " सलप पवार माझा शत्रू आहे. त्याच्याशीं तुम्ही मैत्री ठेविल्यानें माझें शत्रुत्व स्वीकारल्यासारखें होणार आहे हें ध्यानांत ठेवा ! "

भीमदेवानें आपल्या—कच्छ, सिंध, सौराष्ट्र वगैरे आधीन मांडलिक राजांना पाचारण करून तो त्यांच्यासह अबूगडाकडे दौड करून निघाला. थोड्याच दिवसांत ती सेना अबूगडाजवळ येऊन पोंचली. बरोबर चतुर आणि विचारवान अमरसिंह मंत्रीहि होता. त्यावेळीं तो मंत्री सर्व भरतखंडांत जरी नांवाजलेला होता; तरी खरें पाहिलें असता, त्याच्या कुटिल राजनीतीच्याच जोरावर भीमदेवाच्या राज्याधिकाराचें प्रस्थ माजलेलें होतें. भीमदेवाच्या सैन्यानें अबूगडास चहूबाजूंनीं वेढा दिला.

अबुगडचा किल्ला खरोखरीच मोठा जबरदस्त लढाऊ होता. त्याचे मारे व बुरुजांची ठेवण इतकी संगीन होती कीं, तो जिंकणें भीमदेवाला कठीणच होतें. त्याच्या भोंवताली जबरदस्त जलपूर्ण खंदक होता. तो वलांडून जाऊन किल्ला सर करणें मोठें मुष्किलीचें होतें. खाईवरच्या कंगोऱ्यांवर तिरंदाजांचा गुप्त मारा ठेवलेला होता. राजचिन्हांकित निशाणाची जागा इतकी बिकट होती कीं, किल्यांत एक रजपूत शिपाई जिवंत असे पर्यंत निशाण खालीं करण्यास जाणाऱ्या

शत्रूचे हजारों लोक पडावेत. प्रत्येक दरवाजावर असे भले भक्कम लोखंडाचे सुळेदार खिळे बसविलेले होते की, हत्तीच्या टकरीचें त्याच्यापुढें कांहींच चालू नये. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, भीमदेवाच्या दर्पोक्तीला उत्तर देण्यासाठीं सलख पवारानें तो अबुगड लढविण्यासाठीं फारच उत्कृष्ट रीतीनें सज्ज केला होता व त्यानें आपले शूरवीर जमवून त्यांना उत्साहित केले होते.

इच्छिनीकुमारीवर बलात्कार होणार आहे ही गोष्ट समजल्यामुळें तर सर्व शूरवीर आवेशोद्धत झाले होते. इच्छिनीकुमारीहि पूर्ण आणती झालेली असल्यामुळें तिला तिच्या बऱ्या वाईटाचें सर्व समजू लागलें होतें. राणीवशांतील दासी आणि भाट यांच्या तोंडून तिनें पृथ्वीराजाच्या शौर्याचें सुंदर वर्णन ऐकलें होतें. तिनें पृथ्वीराजालाच मनापासून वरिलें होतें. तिनेंहि असा निश्चय केला होता कीं, या युद्धात जर आपला पिता पराजित झाला, तर आपण स्वतां हातीं शस्त्र धरून, आपल्या पित्याला मारणायाला मारू व मग मरू. तिनेंहि आपली एक स्त्रीसेनेची टोळी तयार केली होती शूरवीर क्षत्रिय सैन्य रणाची प्रतिक्षा करीत किल्ल्यावर सज्ज झालें होतें. जैतरायानें आपल्या बहिणीची—इच्छिनीची तारीफ करून स्वतांहि बरेंच सैन्य भीमदेवाच्या विरुद्ध लढण्यास तयार केलें होतें.

इकडे अशा तऱ्हेचा कडेकोट बंदोबस्त सलप पवार राजानें केला होता व तिकडे भीमदेव आपल्या सैन्याचा वेढा अबूगडाला देऊन गडावर हल्ला करण्याच्या तयारीत होता.

एके दिवशीं टेहळणी करतां करतां गडाचा दक्षिण भाग कमकुवत असल्याचें आढळून आल्यावरून त्या भागावर हल्ला करण्याची अमरसिंहानें अनुमति दिली. भीमदेवाच्या लोकांनीं मोठ्या निकरानें हल्ला चढविला. शिड्या, फावडीं वगैरे सर्व सामान आणण्यांत आलें खंदकावर तक्त्यांचे पूल टाकण्याची व्यवस्था झाली.

जैतराय पाहिल्यापासूनच सावध असल्यामुळें त्यानें गडावरून असा जबरदस्त मारा केला कीं, शत्रूच्या शिड्या वगैरे सर्व उध्वस्त होऊन गेलें.

भीमदेवानें दुसरीच युक्ति योजली. त्यानें गोलंदाजाकडून गर्नाळ्यांचा मारा सुरू केला. किल्ल्याच्या तटाचा बराच भाग ढांसळलेला पाहून भीमदेवाच्या सैनिकांनीं जोरानें किल्ल्यांत प्रवेश करण्याचा प्रयत्न चालविला.

सलप पवाराचेहि शूरवीर जीवापाड लढूं लागले. पहातां पहातां हजारों मुडकी इकडे तिकडे तुटून पडलेलीं दिसू लागलीं. वीरगर्जनांनीं आणि घायाळांच्या दुःखोद्गारांनीं दिगंतासह आकाशमंडप कंपायमान झाला. त्या भयंकर रणधुमाळींत भीमदेवाचे अनेक योद्धे जरी पतन पावले

होते, तरी राजा सलम पवाराचेहि—खेमकर्ण खगार, वीरसिंह, जरासिंह इत्यादि मोठाले वीरहि युद्धकामीं आले होते. या लोकाच्या पतनानें फारच हाहाकार उडून गेला होता. कित्येक स्त्रियानीं अक्रोश करीत व भीमदेवाला शिव्याशाप देत आपल्या पतीच्या शवासह सहगमन केलें.

इच्छिनीकुमारी व तिच्या स्त्रियाचें सैन्य यानाहि बऱ्याच जखमा झाल्या. कित्येक स्वर्गस्थ झाल्या. बाकीच्यांना जैतपमारनें संभाळून त्यांच्यासह तो दुसऱ्याच एका जागीं जाऊन छपून बसला अबूगडावर भीमदेवाचें निशाण फडकू लागलें. त्याच्या नांवाची द्वाही सर्व राज्यभर पिटण्यात आली. अबूगडावर एक महिना पचवीस दिवस राहून भीमदेव गुजराथेत निघून गेला व तेथें पृथ्वीराजाचा नायनाट करण्याच्या नव्या नव्या युक्त्या तो रोज योजू लागला.



# दशम काण्ड.

## सैन्यशिक्षण.

सूची चक्रव्यूह रचवावो । दृढ चौकोण सेन सजवावो ।
भेरी नादहि शंख बजावो । विजय पताका खूब उडावो ॥

—चारण भाट.

नित्यनेमाप्रमाणेंच वीरसेन आजहि आपल्या सेनेला शिक्षण देत होता. रणभेरीचे नाद सुरू होते रणभेरीच्या गडगडाटांत पुढील गाणें वीरगण गात होते.

दमामा सनाई बजाओ बजाओ ।
अरे राग मारू सुनाओ सुनाओ ॥
सबै फोज आगे बढाओ बढाओ ।
अरे जैपताका उड़ाओ उड़ाओ ॥
अरे म्यानसो शस्त्र खोलो सुखोलो ।
अरे मार मारो धरो पार बोलो ॥
निसाना सबैला उड़ाओ उड़ाओ ।
अरे बंदुकें ले चलाओ चलाओ ॥

## दशम काण्ड.

कहां वीर हो वेगि धाओ सुधाओ।
अरे शेरताको दिखाओ दिखाओ॥
अरे शत्रुको शीस काटो सुकाटो।
अरे काय ये दौरि डाटो सुडाटो॥
सवै शत्रु सैने भगाओ भगाओ।
अरे युद्ध भारी रचाओ मचाओ॥

भेरीचें वाजणें वंद होतांच एका बाजूनें वीरसिंह आपल्या श्वेताश्वावर बसून सर्व सैन्याच्या पुढें येऊन उभा राहिलेला दिसला. त्या बरोबर सर्व सेनेनें एकदम सलामी दिली. वीरसेनाचा हुकूम होतांच सेनेच्या कवायतीला आरंभ झाला. त्या कवायतींत—चक्रव्यूह, पद्मव्यूह, सूचिव्यूह वगैरेंची रचना करून घेण्यांत आली. कवायतींत झालेल्या दोन तीन चुका दाखवून पुन्हा त्या व्यूहाचा अभ्यास करून घेतला. सैन्यशिक्षण झाल्याबरोबर सैनिकांना रजा देण्यांत येणार होती, इतक्यांत एका निळया घोड्यावर बसून सेनाध्यक्ष चंदनसिंहाची स्वारी तेथें प्रविष्ट झाली. त्याबरोबर सर्व सैनिकांनीं 'भारतमातेचा विजय असो—अमरसिंहांचा विजय असो—सिंध देशाच्या निशाणाचा विजय असो' अशी त्रिवार गर्जना केली.

चंदनसिंहानेंहि आपली ध्वजायुक्त बर्ची वर करून, सैनिकांच्या उत्साहजन्य जयघोषास प्रत्युत्तर दिलें. वीरसिंहानेहि मस्तक लव-

वून प्रणाम केला. त्या नंतर वीरसिंहानें पुन्हा व्यूहरचनेचीं दृश्यें सैनिकाकडून करवून दाखविलीं. तीं पाहून चंदनसिंह खूष होऊन म्हणाला " तुमच्या सेनाशिक्षणाच्या बाबतींत मला काहीच दुरुस्ती करावी लागत नाहीं याबद्दल मला आनंद वाटतो. "

सेनाध्यक्षाच्या मुखातून निघालेले हे उद्गार ऐकून वीरसिंहानें आपल्याला कृतकृत्य मानिलें व त्यानें पुन्हा नम्रतेनें मस्तक लववून चंदनसिंहाला प्रणाम केला.

काही वेळानें चंदनसिंहानें त्याला विचारिलें " वीरसिंह, तुमच्या मध्यें आणि नाहरसिंहामध्यें तंटा कशाबद्दल झाला आहे ? "

वीरसिंहानें नम्रतापूर्वक उत्तर दिलें कीं, " सेनाध्यक्षमहाराज कर्तव्यपालनात मला कोणीहि दोष दिला तरी त्याची पर्वा नाहीं; म्हणून त्या बाबतीत मी इतकंच म्हणतो कीं, मी खरं कर्तव्य बजावलं आहे नाहरसिंह काहीसा हेकेखोर—मत्सरी स्वभावाचा असल्याकारणानं तो सर्वांवर अत्याचार करतो. एका स्त्रीकरिता त्यानं पाच पुरुषांचा संहार केला आहे. त्यामुळें प्रजेवर राजाच्या प्रभुत्वाचा दुष्प्रभाव होऊं लागला आहे. "

वीरसिंहाचें भाषण ऐकून चंदनसिंह फारच आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " एका स्त्रीसाठी पांच पुरुषांची विनाअपराध हत्या ? "

## दशम काण्ड.

वीरसिंहानें " विना अपराध " असें तात्काळ उत्तर दिल्याबरोबर चंदनसिंहाचा संताप अनावर होऊन त्यानें आपल्या पत्रासह दोन सैनिकांना नाहरकडे धाडलें व त्याला पकडून आणण्याची सैनिकांना सक्त ताकीद दिली. त्याप्रमाणें सैनिक नाहरला पकडून आणण्यासाठीं गेले असतां, चंदनसिंह आणि वीरसिंह यांचें आपसांत संभाषण सुरू झालें. सेना जशीच्या तशीच जागच्या जागीं स्तब्ध उभी होती.

आज नाहरच्या अपराधाबद्दल त्याला काय शिक्षा होणार त्याकडे सर्वांचें लक्ष लागलें होतें. सैनिक कंटाळले आहेत असें लक्षांत आल्यावरून, त्यांना विश्रांति घेण्यासाठीं सेनाध्यक्षानें शंखनाद करण्याचा हुकुम केला. सर्व सैनिकांनीं आपल्या बंदुकावरच्या संगिनी उतरून ते इकडे तिकडे पाहूं लागले. कांहीं खालीं बसले व कांहीं इकडे तिकडे हिंडूं लागून आपसांत गप्पा गोष्टी करूं लागले.

अशा तऱ्हेची सैनिकांची विश्रांति सुरू असतां दोघा घोडेस्वारांसह नाहरसिंह घोड्यावर बसून समोरून येतांना त्याच्या दृष्टीस पडला. तो येतो आहे असें पाहून सर्व सैनिकांनीं बोट दाखवून असा संकेत केला कीं, " तो नाहरसिंह येतो आहे. " नाहरसिंहाच्या तें लक्षांत येऊन त्याच्या मनानें घेतलें कीं, आज कांहीं तरी विपरीत प्रसंग आहे, तरी पण तो डगमगला नाहीं. नाहरसिंह तेथें येऊन पोंचल्यावर त्यानें घोड्यावरून उतरून सेनाध्यक्षाला मुजरा केला व " सेनाध्यक्षांचें मला कां बोलावणं आलं होतं ? " इतकें बोलून बाजूला उभा राहिला.

चंदनसिंह म्हणाला, " सेनाध्यक्षानं नव्हे तर तुमच्या प्रारब्धानं तुम्हांला बोलावलं आहे ! "

नाहर हसून बोलला " सर्व जगच जर प्रारब्धाधीन आहे तर माझी काय किंमत ! "

चंदनसिंह बोलला, " जगत् प्रारब्धाधीन नसून, जगत् कर्मवश आहे ! पण काय हो, तुम्ही असलीं नीच कर्म करण्याच्या बाबतींत कंबर बांधण्याचं कारण काय ? "

नाहरनें हसत उत्तर दिलें, " नीच कर्म करणं क्षुद्र पुरुषाचं काम आहे. "

यावर चंदनसिंह दरडावून बोलला, " तुमच्यासारख्या क्षुद्राला भद्र कोण म्हणेल ? "

यावर नाहरने विचारलें " मी असं कोणचं क्षुद्रकाम केलं आहे ? "

चंदनसिंह रागानें म्हणाला, " त्या बिचाऱ्या कुम्हारच्या घराण्याचा निःपात केलास आणि पुन्हां वर नाक करून म्हणतोस कीं मीं कोणचं क्षुद्र काम केलं म्हणून ? शरम नाही वाटत ? या गोष्टीचा भार कोणावर पडणार आहे याचा काही विचार केला आहेस काय ? ज्याचा रक्षक होतास त्याचाच भक्षक झालास याबद्दल लाज नाहीं वाटत ? बेशरम ! क्षत्रियाच्या धर्माची पायमल्ली करतांना यत्किंचित तरी तुझ्या मनाला भीति वाटली होती काय ? "

नाहरनें उत्तर दिलें, " आपण काय म्हणता त्याचा अर्थ मला मुळीच कळत नाही. राजनीतिज्ञ आणि बुद्धिमान लोकांनी खोट्या अफवावर भरसा ठेवण इष्ट नाहीं. "

चंदनसिंहानें पुन्हां दरडावून विचारलें, " तर काय वीरसिह खोट बोलतात ? "

नाहरने " यात काय सशय ! " असें उत्तर दिलें

वीरसिंहाच्यानें तें सहन करवले नाही. तो म्हणाला, " नाहर, दोन दिवसाच्या क्षणभगुर दुनियेत व्यर्थ पाप करण्यात अर्थ काय आहे ? त्याबद्दल तू ईश्वराच्यापुढ काय जाब देशील ? "

नाहर हसून म्हणाला, " ईश्वरापुढें उत्तर द्यायच तर दूर आहे, पण तू इथें तर सध्या उत्तर दे ! देवाच मागाहून पाहता येईल ! "

हें ऐकून वीरसिंहाला फारच सताप आला: तो रागानें म्हणाला, " अरे नीचा, निर्लज्जा, त्या फिर्यादीच्या पुढे तुझी जिव्हा कुठें चरायला गेली होती ? त्यावेळीं मी तुझी समजूत करू लागलों असता, तू माझ्यावरच उलट फिरलास याची तुला नराधमा लाज वाटली का ? याद राख, याच प्रतिफल तुला लवकरच मिळेल ज्या कुमारिकेकरिता तू त्या कुटुंबाला यमसदनीं धाडलेस तीच गोष्ट लक्षात ठेव ! "

इतकें बोलून तो चदनसिंहाला म्हणाला, " सेनासाहेब, ती कुमारी अद्यापि याच्या घरी बंदीवासात आहे. तिलाच आपण येथें आणवली तर या प्रकरणावर चांगलाच प्रकाश पडेल ! "

हें ऐकून चंदनसिंहानें एका सैनिकाला बोलावलें सैनिकाला पुकारल्याबरोबर नाहरच हृदय धडाडू लागल ! तो रुक्ष स्वरात म्हणाला, ' दुसऱ्याच्या लग्नाच्या धर्मपत्नीला या सेनेसमोर बोलावून आणून त्याचा अपमान करण आपल्याला योग्य वाटत काय ? "

नाहरसिह असें भाषण करीत असता राजा अमरसिंहाची गाडी तिकडे येताना दुरून दिसली. बोलता बोलता ती वेगाने तेथें मैदानावर येऊन थडकली ! ती गाडी पाहून नाहरसिंहाचें काळीज फुटल्यासारखें विदर्ण झालें.

राजा अमरसिंहाची गाडी येऊन थडकल्याबरोबर, सेनेला व्यवस्थित होण्याचा इषारा चदनसिहानें शखनादानें दिला व ' सिधी -वजाचा विजय असो ' असा सर्वत्र एकदम हर्षध्वनि झाला. चंदनसिह एका बाजस उभा राहिला. गाडींत—चपा, चमेली, केतकी व महाराज अमरसिह इतकी मडळी होती. बरोबर सरदारांची नववयस्क मुलेंहि होतीं. गाडीतून उतरून अमरसिंहानें विचारलें " आज ही इथें काय हकीकत आहे ? "

चदनसिह म्हणाला, " महाराज, या नाहरसिहाच्या कर्मान आज आम्हा सर्वांना इथें पाचारण केल आहे. कुम्हारकन्या रभा इच्या प्राप्त्यर्थ यानें त्या सर्व कुटुंबाचा विध्वस केला. त्या बाबतींत त्याला वीरसिहांनीं

विचारल असता यानें वीरसिंहाचा अपमान केला. अशा तऱ्हेनें सेनाध्यक्षाचा अपमान सहन करण्यात आला तर इतर सैनिकहि याच अनुकरण करण्याला कचरणार नाहीत ”

हे ऐकून राजासह राजपरिवार नाहरसिंहाकडे रोखून पाहू लागला, तेव्हां नाहर म्हणाला, “राजाधिराज, हें सर्व वीरसिंहानें माझ्यावर कुभांड रचल आहे ”

वीरसिंह म्हणाला, “सरकार, नाहरच्या बंदिवासात अस लेल्या रंभेला जर बोलावून आणवली तर याचा रुपं खुलासा होईल ”

तेव्हा नाहरसिंह विनम्र होऊन म्हणाला, “महाराज, माझ्या धर्मपत्नीला इथें आणवण्यात माझ्या कुलकीर्तीचा नाश होणार आहे!”

अमरसिंह म्हणाला “काय? ती तुझी धर्मपत्नी आहे?”

नाहर घाबरत बोलला, “छे छे! मला रंभेसंबधान काहीच माहीत नाहीं.”

सेनाध्यक्ष म्हणाले, “सरकारनींच याचा न्याय करावा! प्रथम बोलला ती माझी धर्मपत्नी आहे आणि आता म्हणतो, तिच्या संबंधात मला काहीच माहित नाहीं.”

अमरसिंह म्हणाला, “यात बरच काळ बेर दिसत आहे. यास्तव या बाबतीत योग्य चवकशी केली पाहिजे. कनकीमहि मला या बाबतींत एकदां सूचना केलेली आठवते.”

चंदनसिंह म्हणाला, "केतकीनं काय सूचना केली होती?"

केतकी म्हणाली, "एकदां यानं मला भेडावलं होतं! मी त्याला जर स्वयंवरांत वरलं नाही तर तो मला ठार मारणार आहे!"

केतकीच्या आक्षेपावर नाहर म्हणाला, "सरकार, ही अगदीं खोटी गोष्ट आहे."

केतकी म्हणाली, "तू खरा नि मी खोटी ना?"

अमरसिंह मध्येच म्हणाला, "तें असो. मी आता जातों याला हातकडी घालून बंदीगृहाच्या मुख्याच्या हवाली करा. उद्यां किंवा परवां याचा न्याय केला जाईल!"

इतकें बोलून अमरसिंह गाडींत बसून निघून गेला. सनत्प्रक्षानेंही सैन्याला सुटी देऊन आपला घोडा राजाच्या गाडीमागून दौडला. दोन स्वारांसह वीरसिंहानेंहि चंदनसिंहाचेंच अनुकरण केलें. सर्व सेना विश्रांतीसाठीं निघून गेली. नाहरसिंहालाही हातकडी घालून शिपायांनी बंदीगृहाकडे नेलें.



# एकादश काण्ड.

## बटिंडाकडे.



( भुजगप्रयात. )

अहो वीरहो धांवुनीया अरीला ।
खरे शौर्य दावा लढा जिकण्याला ॥
अरे शत्रुशीर्षांस कांपा, जयाला ।
वरा, सत्वरी सौख्य होवो घरेला ॥

—सौमित्र.

शहाबुद्दीन घोराच्या सैन्यानें भोजनोत्तर ' अल्ला हो अकबर ' असा हर्षनाद करून बटिंडाकडे कूच केला. घोडदळ पुढें चालू लागलें. त्याच्या मागून खेचराच्या गाड्या चालू लागल्या. त्याच्या मागें साहणी-स्वाराचें बिकट दळ चालत होतें. उंटावर रत्नखचित भरजरी झुली घातलेल्या होत्या. कांहींवर नगारे, काहींवर तासे व कांहींवर रणमस्त करणारें पेय भरलेले कुंभ होते. काहीं उंटावर रणनौबदी व बाजे वाजत होते हत्तींवर रणशिंगें, तुताऱ्या, कर्णे आणि रणनौबदी वाजत होत्या. नगारखान्याजवळच एका हत्तीवर त्या मुसलमानी सेनेचा अर्धचंद्रांकित

हिरवा झेंडा फडकत होता. ‘ अल्लाहो अकबर ’ आणि ‘ इसालामिया ’ असे हर्षध्वनी करीत ती सेना चालली होती. सेनेच्या मध्यभागीं शहाबुद्दीन एका हत्तीवर बसून चालला होता. त्यानें आपल्या सैन्याचा उत्साह वाढेल अशा तऱ्हेचीं भाषणेंही मधून मधून करण्याचें काम चालविलें होतें. त्यानें गर्जना करून रणधीर गभीर आवाजांत आपल्या सेनेला उद्देशून म्हटलें, “ शूरमा बहादुरों, खबरदार ! याद रखना, एक दिन मरना है ! इसलिये घर लौटनेका नाम मत लेना ! दुनियेमें शानके साथ रहनाही तुम लोगोंका वसूल होना चाहिये. अगर हिंदपर कामयाबी हो गई तो याद रखना के तमाम दुनियामें तुह्मारा बोलबाला है वरन योंही इसी पहाडी में मिस्ल फलोंगे और गिरकर सुख जाओगे. तुम्हारी महक कोई पाभी न सकेगा. दुनियामें तुम्हारा आना फजूल होगा. इसवास्ते बहादुरीके साथ दिलावरी दिखाना और मतहवे इसलामियाका झंडा हिंदमें उडाकर तब पीछे घरकी और कदम रखना ! ”

शहाबुद्दीनचें हें वीररसोत्पादक भाषण ऐकून “ अल्ला हो अकबर ’ आणि “ फतहयाबी ” अशा गर्जना करून सैन्यानें शहाबुद्दीनाच्या भाषणाला समती दिली. आपल्या सैन्याला उत्साहित आणि प्रफुल्लित पाहून, शहाबुद्दीननें आपल्या त्या उत्साहित सैन्याला अधिक स्फुरण चढण्यासाठीं आणखी एक जोरदार भाषण केलें. तो म्हणाला “ सच है ! शेरके बच्चे शेरही होते है. हमारे ऐसे शेरोंके बमुकाबले

कोन ठहर सकता है ! भला हिंदके बकरे और क्या हमारे सामने ठहर सकते है ! देखते ही देख ते हम सब उन्हे जा दबावेंगे. इनने न तो मेल जोल है ओर न हुबोवत नहीं है. खाली आपसके झगडों ही मे मस्त रहते है. ये अपनी इज्जतके लिये जानकी परवाह न करें गे पर अपने भाईकी इज्जत जाते समय कुछ भी न बोलेंगे वरन औरभी अपनी भाईको नीचा दिखाने के लिये दुश्मनकी मदद करेंगे. अभी हाल ही की बात लीजिये. उन्ही का भाई जयचद हम लोगोंकी मददके लिये तयार है. जब घरहीमें नफाक है तो फिर बाहारवालों को उनके घरमें घुसते क्या देरी लगती है ! बातकी बातमें उन्हें मौका पाकर दबा देना चाहिये. वरन जब ये सहजोर हो जाय गे तब इन्का जीतना मुशकील होगा. खैर, मुल्क हिंदका सवाल पीछे हल किया जायगा. अभी तो बाटिंडापर ही बहादुरी के साथ धावा करना है."

याप्रमाणे भाषणें ऐकत ऐकत शहाबुद्दीनचें सैन्य वाटिंडाकडे चाललें होत. त्याचे अर्धचद्रांकित प्रशस्त हिरवें निशाण डौलानें हवेंत फर्र फर्र अवाज करीत डुलत होतें. वीरगण उत्साहात निमग्न झाले होते. जणू काय ते जगजेतेच आहेत असें भासत होतें. त्यांनीं प्रथम पासूनच गख्खरांच्या भीतीनें सैन्याच्या तीन निरनिराळया टोळया करून आपला मार्ग आक्रमण करण्याचें काम चालविलें होतें. गख्खर लोक कोण होते त्याबद्दलची हकीकत वाचकांनीं मागें सहाव्य काण्डांत

वाचलीच आहे. यास्तव, आतां पुन्हां यांचा वृत्तान्त येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. असें जरी आहे तरी येथें इतकें आवश्य सांगितलें पाहिजे कीं, अशा बिकट प्रसंगीं त्या लोकांनीं दरोडेखोराप्रमाणें हल्ले करण्याचें सोडून सद्यःकालीन सुशिक्षित सैन्याप्रमाणें त्या सेनेच्या तुकडीवर आपला हल्ला चढविला होता. गख्खरांनीं पहिल्या झटक्याला बेगमेवर हल्ला केला. त्यांना त्याच सैन्यभारात बेगम आहे ही बातमी कशी समजली असेल ती असो. त्यांनीं त्या तुकडीचा असा संहार केला कीं, ती बातमी शहाबुद्दीनला समजेपर्यंत दोन्ही बगलाचे तीनशे लोक कापले गेले. कांहीं स्त्रियांनांही त्यांनीं आपल्या घोड्यावर घालून पळविल्य अशा तऱ्हेचें बेगमेवर संकट आलेलें ऐकून वोरी प्रथम फारच घाबरला, परंतु त्यानें तात्काळ नुसरतखां व तातारखां यांना तिकडे दौड करून जाण्याची आज्ञा दिली. तातारखानानें तावडतोब लगट करून गख्खर लोकांना चहूंकडून वेढा दिला. त्या प्रसंगीं तेथें फारच जोराची कत्तल सुरू झाली. मोंगलांच्या समशेरी आणि गख्खराच्या गुजराथी तलवारी फारच प्रलय करूं लागल्या. त्यावेळीं अवघे तीनशें गख्खर लोक लाख दीडलाख मोंगली सैन्याच्या वेढ्यांत सांपडले होतें. त्यांचा बचाव होण्याची निराशा झाल्यामुळें त्या सर्वांनीं एकमतानें असा विचार केला कीं, ही आपली अखेरची वेळ आहे हातावर शिरें घेऊन या प्रसंगीं सर्वांनीं लढलें पाहिजे. त्यांनीं वेढा फोडून पार होण्याचा प्रयत्न

केला पण तो जेव्हा निष्फळ झाला तेव्हा त्यांनीं नरसिंग वाजविले. सर्व गख्खर लोक एकत्र झाले. हातीं सापडलेल्या सर्व स्त्रियांना कापून काढण्याचें त्यांनीं ठरविलें. इतकें ठरवून त्यांनीं तातारखानाची- एकवार—आपला रस्ता सोडण्याची प्रार्थना केली व रस्ता न दिल्यास पाडाव केलेल्या मोंगली स्त्रियांस कापून काढण्याचीहि एक धमकी दिली. ही धमकी ऐकून तातारखानाचे डोळे उघडले. लढाईच्या दगलींत आतापर्यंत तातारखानाच्या ध्यानांतहि स्त्रियांचा विषय नव्हता. तातारखानानें त्या लोकांचें म्हणणें ऐकलें व ते सर्व तेथून झपाट्यानें निघून गेले. तातारखानानें स्त्रियांचा जेव्हा पत्ता काढला तेव्हा एकशेंतीन स्त्रिया बेपत्ता आहेत असें त्याला आढळून आलें ही स्त्रियांची झालेली लूट शहाबुद्दीनाला समजल्यावर काय होईल या भीतींत तो निमग्न झाला

थोड्याच वेळेंत लढाईचा शेवट झाला. सहार झालेल्या दळाची जव्हा गणती करण्यात आली तेव्हा, सहाशें अफगाणाचे देह व गख्खराचे दोनशें मुडदे रणभूमीवर मोजण्यांत आले. एकशेंतीन औरतांचा पत्ता नाही असें जेव्हा घोरीला समजलें तेव्हा त्याचा जीव फारच दुःखी झाला त्यानें तातारखानाच्या हाताखालच्या सेनानायकाला बोलावून आणून रा॰ ॰ म्हटलें, " नालायक हरामजादो तुम लोगोंको शरम नाहीं आती की महज तीन चारसो डाकुओंसे तुम आपनी औरतोंकी हिफाजत न कर सके ! खैर, इस्की सजा तुम सब जरूर पावेंगे. तातारखा, मुझे सख्त आफसोस है कि तुम्हारे रहते, यह वारदात हुई. "

तातारखाना यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यानें आपलें मस्तक खालीं घातलें व तो गप्प उभा राहिला.

थोड्या वेळानें शहाबुद्दीन सतापून बोलला, "आज यहिपर ठंडाई करो. कल बाटिंडातक जा धमकना है! सिंधका किनाराभी एक पडावमें आ जायगा! आज यहिपर पडाव डाला जाय. कल शुभह होतेही कूच किया जायगा."

इतकें बोलून शहाबुद्दीन आपल्या डेऱ्यात निघून गेला. इकडे तातारखान आणि निसुरतखान यानीं उपसेनापतीना बोलावून म्हटलें, "वाकई यह वा कया, बहुत ही खराब हुवा. तुम सब क्या अफीमकी पिनकमें रहे जबकी गख्खरोंनें हमला कियाथा! खैर, जो कुछ हुवा सो हुवा! अब, अइदा ख्याल रखना! मरे हुये सिपाहियोंको दफन करो और घायल बहादुरोंकी दवा करो."

इतकें सांगून ते दोघे आपापल्या डेऱ्यांत निघून गेले. शिपायानीं कमरबद होऊन बरोबर डोल्या वेतल्या व घायाळ शिपायानां मुक्कामावर आणण्याची व्यवस्था केली आणि पडलेल्या शिपायांचीं प्रेतें त्यांनीं पुरलीं. तें सर्व काम फार त्वरित करण्यांत आलें.

त्यावेळीं सूर्याचे रक्तवर्ण किरण पश्चिमेच्या क्षितीजात बुडले होत. पक्षिगण आपल्या स्वाभाविक कलरवाचा किलकिलाट करीत वृक्षांवर बसला होता. त्या सध्यासमयीं पर्वतशिखरांची शोभा कांहीं अपूर्व

दिसत होती कीं काही विचारूच नये. सूर्याचीं तीं अस्तसमयींची लाल मृदु किरणें पर्वताशिखरांवरील ज्या ज्या म्हणून वस्तूवर पडली होतीं त्या त्या वस्तु तद्रूप होऊन सर्वत्र रक्तवर्णाचा अपूर्व देखावा दिसत होता. सुकलेलीं लाकडें व पानें यात तर त्या किरणांनीं नवजीवन आणल्याचाच भास होत होता. पर्वताच्या दुसऱ्या बाजूला खळखळ आवाज करीत वाहणाऱ्या जलौघातून वाहात जाणाऱ्या लांकडातहि त्या किरणानीं प्रवेश केल्यामुळें तीं त्या रक्तवर्ण पाण्यात पोहणारीं माणसेंच आहेत असा भास होत होता. कोठें कोठें बर्फाचे तुकडे त्या किरणांत फारच रमणीय दिसत होते जलौघाच्या किनाऱ्यावरील वृक्षपल्लवींची शोभा तर अवर्णनीयच दिसत होती. जलौघ—उच नीच प्रदेशातून वाहात असतां त्याच्या जलगतीवर उचनीच भागीं ते रक्तरश्मि नाचताहेत असेंच दिसत होतें. कोठें कोठें पाणी संथपणें वाहात असून कोठें कोठें तुटक्या कड्यावरून धाडधाड असा भयाण आवाज करीत खालीं पडून पुन्हा तेंच पाणी दऱ्यातून मंजुळ ध्वनी करीत वाहात होतें. तो कर्णमधुरनाद ऐकत तेथेंच एकसारखें बसावें असें कोणासहि वाटल्यास आश्चर्य नाहीं. एकदरीत, त्यावेळची निसर्ग देवतेची तेथील वृत्ती फारच चमत्कारिक वृत्तीची दिसत होती.

तेथील पहाडी लोक त्या पर्वतांतील नद्यांमधून, शहाबुद्दीनाला केव्हां केव्हां रसद पोंचवीत असत. गख्खरांचे रणांगणावरील मुडदे

त्या नद्यांत फेंकून देण्यात आले. फकीर आणि काजी यांनी कलमे पढून अन्यविधी उरकून टाकला. पहाडाच्या एका बाजूला खाना तयार होत होता. सर्व सैन्यानें थोडी विश्रांति घेतली. इतक्यात खाना खाण्यास जाण्याची तुरई वाजली. खाना संपेपर्यंत निशानाथानें आपला पूर्ण अमल बसविला होता. रात्रींच्या हिंस्रपशूच्या गर्जना सर्वत्र ऐकूं येऊं लागल्या. सेनापतींनीं आपापल्या गोटाचा योग्य बंदोबस्त करून हिंसक पशूपासून बचाव करण्याकरितां सभोंवार हिलाल, मशाली व आगी पेटवण्यात आल्या. प्रहर रात्रपर्यंत जरी पहारा होता तरी हिंसक पशूंनीं दोनचार जिवांना पळवून नेलेंच. त्या घनघोर अंधःकारमय रात्रींत मशालीचा उजेड फारच गमतीचा दिसत होता. भोंवतालच्या प्रज्वलित विस्तवाचा धूर नीलनभोमंडलांत एकत्र होऊन पसरतांना फारच बहारीचा दिसत होता. काही सैनिक तर गनिमाच्या अनपेक्षित छाप्याला भिऊन सशस्त्र जागतच बसले होते. काही सैनिक बिनदास्तपणानें आपसांत बाता मारीत बसले होते. असा प्रकार त्या गोटांत चालू असतां रात्र संपत आली. दिवसा विचरणाऱ्या जीवजंतूचे शब्द ऐकूं येऊं लागले. अजून जरी उजाडलें नव्हतें तरी सैनिकांनीं तयार होण्याची तुरई वाजली गेली. सर्व सैनिक आपापलीं शस्त्रास्त्रें ठीक ठाक करूं लागले.



# द्वादश काण्ड.

## विरह चंपाकुमारी.

( द्रुतविलंबित. )

तळमळे उदकाविण मासळी ।
रविकरें सुकने नलिनीकळी ।
तनुलता तशि या सुकुमारिची ।
दिसतसे प्रणयांकितदीप्तिची ।।

—सौमित्र.

चंपाकुमारी चंदनसिंहाच्या विरहानें फारच व्यथित झाली होती. रात्रंदिवस त्याच्याच तिला ध्यास लागला होता. सकाळसंध्याकाळ, दोनप्रहर मध्यरात्र—सर्वकाळ ती चंदनसिंहासंबधानेंच विचारमग्न असे. त्या चिंतेनें ती काहींशी रोगट दिसू लागली होती. तिचें मुख जें सुंदर कमलाप्रमाणें प्रसन्न दिसत असें तें कोमेजल्यासारखें झालें होतें. प्रात:कालीन सरोवरातल्या सुंदर मनोहारी कमळांतील श्री ज्याप्रमाणें सूर्यनारायण छिनावून नेतो त्याप्रमाणें यावेळीं चंद्रानें तिच्या मुखारविंदाची श्री हरण केली होती. अरेरे ! जें चंपेचें मुख रतीलाही लज्जित करीत असे तेंच

सध्या यःकश्चित स्त्रीच्या मुखापेक्षाहि ओंगळ दिसू लागलें होतें. काल रात्री ती आपल्या महालाच्या गच्चीवर चांदण्यांत बसली होती. जवळच दासीजन वारा घालीत उभ्या होत्या. नानाप्रकारच्या सुखोपभोगाच्या वस्तु तेथें सभोंवार ठेवलेल्या होत्या. जलपानाचे अनेक पुष्पगंधित चबू तिवयावर ठेवलेले होते. फळफळावळ, जेवणाच्या वस्तु वगैरे सर्व जरी तयार होत्या तरी त्या तिला विषवत् वाटत होत्या. ती जेवण्यास जरी अनमान करीत होती, तरी आपला अंतरंग कोणास समजू नये म्हणून कशीबशी टिवल्या बावल्या करीत जेवू लागली. पण तिचे चित्त चंदनसिंहाकडे असल्यामुळें, भोजनाच्या पदार्थांपैकीं काहीं भाग थाळ्याच्या बाहेर सांडत होता व कांही सबंद घास तर तोंडातून ताटात परत पडत होते तें पाहून ती दचके व लगेच शुद्धीवर येऊन जेवू लागे; पण हें किती वेळ टिकणार ! अखेर एकदाचें जेवण संपलें. दासीजनांनीं विडे दिले, अत्तरगुलाब झाला, सर्व कांही झालें; पण तिला त्याचें कांहींच नव्हतें. तिचा देह मात्र तेथें असून अंतःकरण चंदनसिंहाच्या भोंवतीं घिरट्या मारीत होतें. दासीजनांनीं तिची ती कामवश स्थिति ओळखून तिला रमवण्याचा, हंसवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण सर्व व्यर्थ. दासींच्या त्रासातून सुटून आपल्याला हवा असलेला एकांतवास लवकर प्राप्त होत नाहीं, असें जेव्हां तिनें पाहिलें तेव्हां ती जांभया देऊं लागून झोंपेचें मिष करूं लागली, नंतर तिनें

डोकें दुखण्याचा बाहाणा करून आपला देह गालिच्यावर टाकून दिला. अशा तऱ्हेनें तिनें एकांत मिळण्यासाठीं अनेक बाहणे केले पण दासी जेव्हां आपल्यापासून दूर होत नाहींत असें तिच्या निदर्शनास आलें तेव्हां ती त्यांना तेथून जाण्यास सांगण्याची जों मनात तयारी करते आहे तोंच तेथें केतकी एकदम आली व म्हणाली, " चंपेची प्रकृति बरी नाहींशी दिसते. ती लवकर निजण्याच्या तयारींत आहे वाटत ? "

दासींनींहि होस हो टोकून दिल्यामुळें चंपेचें आयतेंच काम झालें तिनेंहि तात्काळ आपली प्रकृति बिघडली असून आपण लवकरच निजणार असल्याचें सांगितलें. दासींनीं लगेच अंथरूणापांघरुणाची नीट व्यवस्था पाहिली व त्या तेथून निघून गेल्या त्यांच्या मागोमागच केतकीहि निघून गेल्यामुळें चंपेला बरें वाटलें.

दासी व केतकी तेथून निघून गेल्याबरोबर चंपेनें आपल्या महालाचें दार लावून घेऊन आंतून कडी लावली आणि ती आपल्या पलंगावर जाऊन पडली. ती तेथें पडली असतां तिच्या नेत्रांच्या समोरच तिला खिडकींतून आकाशांत चंद्रमा प्रकाशलेला दिसला. तो दिवस पौर्णिमेचा असल्यामुळें सर्वत्र चांदण्याचा पूर्ण प्रकाश पसरला होता. चंपाकुमारीवरहि त्याचा प्रभाव झाला. चंपेनें आपल्या प्रियकरासंबंधानें विचार करीत स्वगत म्हटलें, " अरे चंद्रा, तू सर्व जगताला जरी सुखकारक असलास, तरी या वेळीं मला कांट्यांसारखे आपलें

किरण बोचतो आहेस ! आपल मन दुःखी असत तेव्हां आपल्याला जग सुन वाटत अस म्हणतात ते खर आहे. पहा—हा चद्र—ज्या लहान नद्या मोठाल्या नदाना कलकल शब्द करीत जाऊन मिळतात, त्यांना कसा आनदकारक आहे ! या चद्रप्रकाशांत हिंस्त्र पशु मोठ्या आनदान जगलांत विहार करीत असतात ! सिंह सिंहिणीशीं या वेळीं आनदान रममाण होत असेल; पण मला हा चद्र या वेळीं तप्त लोहशूलासारखा वाटतो आहे. ”

अशा प्रकारचे विचार करीत करीत तिनें क्षणभर चद्रकिरणापासून आपली दृष्टी दुसरीकडे वळविली. कांही वेळानें पुन्हां तिनें चद्राकडे पाहून म्हटलें, “ बा चद्रा, तूं मला दुःखी करूं नकोस. लवकर त्या ढगाच्या आड हो आणि विरहवेदना नष्ट कर ! नाहीं तर अशाच विचारानीं मी मरून जाईन आणि त्याचं पाप तुला भोगाव लागेल ! हाय ! चदनसिंहजी, तुम्ही कृपा करून या चद्रज्योतीला माझ्यासाठीं चदनाची तरी उटी चढवा हो ! ”

अशा तऱ्हेच्या चिंतेंत मग्न असता चपेनें आपलें अग या कुशीचें त्या कुशीवर वळविलें व तक्यावर एक हात टाकून आपल्या मस्तकाचा आग्रभागहि त्यावर टेंकला. त्या वेळीं तिच्या मनात आलें कीं “ आज चार दिवस होऊन गेले पण अजून चदनसिंहांकडून सुदरी दासी उत्तर कशी घेऊन आली नाहीं ? दासी आपल्या घरी तर परस्पर गेली नसेल ना ? कां काहीं घातपात आहे ? ”

## द्वादश काण्ड.

इतका विचार मनांत येताच तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले. ती रडू लागली. तिनें आपलें डोकें वर करून म्हटलें, "परमेश्वरा, चंदनसिंहानीं माझं पाणिग्रहण केलं तर मी फार अभारी होईन, पण बाबा तें कसं करू देणार ? त्यांनीं तर उत्तमोत्तम राजकुमाराचा शोध चालविला आहे परवा ते आईशीं बोलतां बोलतां म्हणाले कीं 'जो प्रसंगीं आमचं रक्षण करू शकेल अशाच उत्तम राजकुमाराशीं चंपेचं लग्न करण्याचं मीं ठरवलं आहे ' पण मी म्हणतें चंदनसिंह काय कमी आहेत ? राजकुमार तर बसल्या जागेवरून हुकूम सोडणारे असतात, पण आमचे चंदनसिंह तर स्वतः हातीं शस्त्र धारण करून शत्रूशीं लढतात "

असा विचार करीत असतां चंपा आपल्या पलंगावरून उठून खिडकींत गेली व कठड्यावर हात टेकून चंद्राकडे पुन्हा पाहू लागली आतां तर तिनें हात जोडून चंद्राला उद्देशून म्हटलें, "बा चंद्रा, तू असा निष्ठुरतेनें मला अभागीला व्यर्थ कां छळतो आहेस ? मला चिडवून दुःख देण्यासाठींच तू आपली पूर्ण प्रभा आज फाकली आहेस कीं काय ? असो. तुझी इच्छा असेल तसं कर ! पण लक्षात ठेवा कीं, अशा तऱ्हेनं मला दुःख देणं तुला शोभत नाहीं. जगाच्या सुखदुःखाचा उत्तरदाता तूच आहेस; म्हणून समजून उमजून न्यायानं काय करायचं असेल तें कर ! "

कोणास ठाऊक? चपेची ही विनती ऐकूनच की काय जवळच्याच आभ्रपटलात चद्र त्याच वेळीं अदृश्य झाला. चंपेनें त्याला धन्यवाद देऊन म्हटलें, "चद्रदेवा, तूं खरोखरच धन्यवादाला पात्र आहेस. तुझ्यात विवेक आहे!" इतकें बोलून ती परत पलगावर बसून निश्वास सोडीत अथरूणावर पडली.

तशाच स्थितीत ती पुन्हा विचार करूं लागली कीं, "चंदनसिंहानी माझ्या पत्राचं उत्तर का बर धाडल नाही? माझ्या हातून काही चूक तर झाली नाहीं ना?" इतकें बोलून ती दुसऱ्या कुशीवर वळून म्हणाली, "आल लक्षांत! त्या दिवशीं सैन्याशिक्षणाच्या वेळीं मी बाबाच्या बराबर मैदानात गाडीतून गेलें होतें, त्या वेळी त्याच्याशी भाषण केलं नाहीं हेंच त्याच कारण असल पाहिजे! पण त्यावेळी मी त्याच्याशीं बोलण योग्य होत का? नव्हत म्हणून तर मी त्याच्याकडे प्रेमपूर्ण दृष्टीन पाहिल आणि त्याच उत्तर त्यानींहि त्याच भावपूर्णतेन दिल. छे! ही चूक सुदरी दासीचीच आहे. मला न विचारता ती परस्पर घरीं निघून गेली आहे. याचा वचपा काढल्याशिवाय मी कधीच राहायची नाहीं. ती परत आल्यावर तिला काढून टाकून तिच्या बदली दोन दासी अधिक ठवीन."

इतका विचार मनांत आणून चंपा उठून बसली व पलंगाखालीं उतरून इकडे तिकडे फिरूं लागली. कांहीं वेळ फिरल्यावर पुन्हां बसली

बसणें उठणें असें वारवार चाललेंच होतें. पुन्हा ती चद्राकडे पाहून म्हणाली, " दुःखिताला अधिक दु.खी करण्याचच तू वत पतकरल आहेस कीं काय ? थोड्याच वेळापूर्वी आभ्रांच्या आड लपून तू आपल मित्रत्व प्रगट केल होतस आणि पुन्हा आपला आता पूर्ववत् पूर्ण प्रकाशान चमकू लागला आहेस याचा अर्थ काय ? आल लक्षात, तुझा माझ्यावर राग का आहे तें ! गुरुगृही शिकत असतांना आम्ही कुमारिकानी केवळ सूर्याचीच आराधना केली होती ! सूर्यासारखाच प्रकाशमान तेजस्वी वर मिळावा म्हणून आम्ही त्यावेळी फक्त सूर्याचीच स्तुती केली होती हें खर आहे ! पण आता तुझी प्रार्थना करतें कीं, कृपा करून तुझ्या किरणासारखा शीतल आणि सुखदायी असा चदनसिंह मला वर मिळो. चद्रदेवा, माझ्या प्रार्थनेचा स्विकार करून माझ दुःख निवारण कर. सध्याकालीन कमलातली श्री हरण करून तिच्या योगान मला का वर तू प्रफुल्लित नाहींस ? मीं अस कोणच पाप केल आहे की, मी तुझी अनेक प्रकारांनीं विनती करीत असताहि एखाद्या निष्ठुर पुरुषाप्रमाणें ती मान्य करीत नाहींस ? "

असा विचार करीत चपा तेथेंच वसली. एक हात डाव्या पायावर व दुसरा जमीनीवर टेंकून ती म्हणाली, " पुरुष तरी किती निर्दय असतात पहा ! ते आपल्यावर प्रेम करणारींवर लवमात्रही दया करीत नाहीत ! प्रिया चदनसिंहा, तुमच्या मनांत लवमात्र जरी दया

असती तरी मला असा विरहताप सहन करावा लागला नसता ! नाहीं नाहीं; पण हा सर्व दोष माझ्याच उतावळेपणाचा आहे. घाई करण्याची मला काय बर जरूर आहे ! ”

इतका विचार करून चपा काही वेळ स्तब्ध राहिली व पुन्हा मनाशीं विचार करू लागली. “ पण घाई न करावी तर काय करावं ? बाबानी दुसऱ्याच राजकुमाराला वचन दिल तर काय करणार ! पण समजा त्यानीं वचन दिल तर दिल ! माझ प्रेम तर याच्यावरच आहे ना ! आपण कोणावरहि प्रेम करण हें काही पाप नाहीं. मात्र तें मर्यादेच्या बाहेर नसाव ! मी विवाहाच्या आधी आपली इच्छा प्रगट करीन. मी सती आहें. माझे प्राणपति चदनसिह आहेत. ते जरी एका साधारण सेनापतीचे पुत्र असले तरी त्यांत काय झाल ! त्याच कुळ काहीं हलकं आणि डागळलेलं नाहीं ! ते कां शौर्यांत कोणापेक्षां कमी आहेत ! शूरवीरात त्याच्याकडे कांहीं कोणीं तुच्छतेन बघत नाहीं ! नाहीं—नाहीं —माझे प्रियकर कोणत्याच बाबतींत कोणापेक्षाहि कमी प्रतीचे नाहींत. प्रिय चदनसिंह चद्राप्रमाणें चौसष्ट कलांनीं परिपूर्ण आहेत. ”

आपल्या भावी पतीची अशा तऱ्हेनें प्रशसा करीत चपा उठली व आपल्या बिछान्यावर जाऊन पुन्हा चदनसिहाचें ध्यान करीत पडली. वाहवारे प्रेमा ! तुझा महिमा आगाध खराच ! तू काय करीत नाहींस

व काय करणार नाहींस ! ज्या पुरुषानीं सुदर–सुखद बिछान्याशिवाय इतर कोणच्याहि बिछान्याचें नांवहि ऐकल नसत अशांना तू मरुभूमिसारख्या प्रखर व कटकयुक्त वनातहि गाढ झोप लावतोस. ज्या राजकुमारी अनेक प्रकाच्या सुखोपभोगात व विलासात वाढलेल्या असतात त्याना तूं आपल्या प्रियकरासाठीं त्या सर्वावर तिलांजली देण्यास समर्थ करतोस ! राजकुमारी चपाहि त्याप्रमाणें आज प्रेमाच्या भोंवऱ्यात सापडून चकरा खाऊ लागली आहे. प्राणीमात्राचें जीवन जसें विरहानें शोषलें जातें तशीच चंपेचीहि सध्या स्थिति झाली आहे. तिच्या लावण्याची अगदीं राड उडाली आहे. वास्तविक प्रेमाचा पथच निराळा आहे. चदनसिंहाच्या विरहानें चपा दिवसोंदिवस झुरणीस लागून अगदीं क्षीण होत चालली होती. अशा स्थितींत त्या दिवशी ती आपल्या महालात एकटीच विचारमग्न पलगावर पडली असतां, तिच्या कानाना एका एकीं पुढील दोहा ऐकू आला—

कली अली को सांझ हीं मन छूअन दे डार ।
मोर हात सन्मानियो, देकर रसको सार ॥

हा दोहा ऐकून चपा उठून बसली व खिडकींतून इकडे तिकडे पाहू लागली, पण कोणीच दिसलें नाही. तिनें लगेच महालाचें दार उघडून बाहेर पाहिलें पण बाहेरहि कोणी तिला दिसलें नाहीं. चंपा

थोडीशी घाबरली व तिच्या मनांत अनेक विचारांनीं उसळ्या मारल्या. " देवा, हा दोहा कुणी म्हटला व कां म्हटला बर ! या दोह्यावरून असं स्पष्ट दिसत की, तो म्हणणाऱ्याला माझे सर्व विकार ठाऊक आहेत." विचारांनीं तिला असें वाटलें की, ही गोष्ट केतकीशिवाय कोण जाणणार ! चपेनें " केतकी, केतकी " अशा हाका मारल्या पण कोणीच उत्तर दिलें नाही शेवटी चपेनें " शब्द खरे ठरोत " असें म्हणून पलंगावर आग टाकलें.



# त्रयोदश काण्ड.

## शहाबुद्दीनची मदत.

(मालिनी)

बघुनि धनिक होतो दुःखि कंगाल भारी ।
आशिच जगति रीती दीसते स्पष्ट सारी ॥
बघुनि शशि उदेला चोर दुःखास पानी ।
जगत सतत ऐसे चालते या क्रमांनी ॥

—सौमित्र.

भोलाराय भीमदेवानें अबूगडावर आपला झेंडा फडकावून तेथें जरी आपला अधिकार चालविला होता, तरी त्याच्या मनातील पृथ्वीराजाबद्दलची धास्ती गेलेली नसल्यामुळें, त्यानें त्या गडाचा बंदोबस्त फारच सावधपणानें केलेला होता. तो आपल्याला मोठा प्रतापशाली समजत असे. इच्छिनीकुमारीच्या बाबतींतला पृथ्वीराजाचा प्रयत्न त्याला सहन झाला नाहीं. आपल्या पट्टनपुर नामक राजधानीत परत आल्यावर त्यानें पृथ्वीराजाचा पाडाव कसा करावा या बाबतीत आपल्या मित्रमंडळाशीं खलबत करण्याचा क्रम सुरू केला. सरळ दिल्लीवरच चाल करून जाऊन

पृथ्वीराजाला धुळीस मिळवावा असेंहि एकदा त्याच्या मनात आलें होतें; परतु त्याच्या मन्त्र्यांनीं तो बेत खोडून काढला कारण, पृथ्वीराजाचे सामत फार शूर, चतुर व बलाढ्य होते हें त्याना पुरें माहित होतें. पृथ्वीराज शिकारीचा मोठा शोकी असून, तो लोकांना सोडूनहि कधी कधी एकटाच शिकारीच्या मागें जगलात धावत जातो हें भीमदेवाला माहीत असल्यामुळें, तशा स्थितींत त्याला गाठून ठार मारावा असेंहि त्याच्या मनात आलें. अशा तऱ्हेचे पृथ्वीराजाला ठार करण्याचें अनेक विचार जरी भीमदेवाच्या मनात एकामागून एक येत होते, तरी कार्य-रूपानें त्यांनां परिणत करणारा एकहि त्याच्या दृष्टीस पडेना. त्याच्या दरबारात राजनीतिनिपुण असा काय तो एक अमरसिंहच होता. तो मत्र, तंत्र व राजनीती यात मोठा कुशल होता. त्याच्याच युक्तिवादानें भीमदेवाला अबूगड सर करतां आला होता हें वाचकाना स्मरत असेलच.

अनेक प्रकारचे उपाय शोधतां शोधतां शेवटी, पृथ्वीराजाला नामोहरम करण्याचा एक उपाय सुचला व तोच पुढें वादाविवादानतर मुक्रर करण्यांत आला. परकीयांचें साह्य घेऊन जर पृथ्वीराजाचें पारि पत्य करता आलें तर काय हरकत आहे! सामत, सरदार व मत्री यांच्या सल्लयानें शेवटीं असें ठरलें कीं, शहाबुद्दीनाच्या मदतीनें पृथ्वी-राजाचें पारिपत्य करावें. त्यांत आपली हानी होण्याचा मुळींच सभव नाहीं. बऱ्याच अदूरदर्शी सामंतांनीं या गोष्टीस जरी पुष्टीकरण दिलें,

तरी कांहीं विचार सामंतांनी मोठाच विरोध केला. त्यावेळीं भीमदेव म्हणाला, " तर मग असा कोणचा उपाय योजिला असता, पृथ्वीराजाचं पारिपत्य होईल तें तरी सांगा ! "

एक सामंत म्हणाला, " पृथ्वीराजाचं पारिपत्य करण्यानं आपली महती वाढणार आहे असं मला तरी निदान वाटत नाही. आपलं कार्य आपण साधलं म्हणजे झालं. इच्छिनीकुमारीच्या बाबतीत आपला अपमान झालेला आहे, तर तिला पकडून आणण्यानं तो भरून काढला म्हणजे आपलं कार्य झालं. साप मारावा पण काठी तुटू नये असं करणंच उचित आहे. आमच्या धर्माच्या शत्रूला आंत बोट शिरकवतां येणार नाहीं अशी युक्ति योजून, आपला कार्यभाग साधून घेणं यांतच आपलं हित आहे. "

दुसरा एक सामंत म्हणाला, " महाराज, यवनाचा पाय या भारतवर्षांत घुसवू देण्यापेक्षा, आपणच आपल्या बाहुबलानं, पृथ्वीराजाला शरण आणावं, हेंच सयुक्तिक व आपल्या देशाच्या हिताचं आहे अशी माझी ठाम समजूत आहे. "

अशा दोन प्रकारच्या सल्ल्याच्या पेचांत भीमदेव पडला असतां, त्यानें अनंगसिंहाचें मत विचारलें. तो म्हणाला, " महाराज, या बाबींत माझी बुद्धि काम करूं शकत नाहीं. एकीकडे आपला अपमान

व दुसरीकडे विदेशी शत्रूच्या साह्यानं आपल्या बांधव शत्रूचा निःपात ! राजनीती असं कधींच सांगणार नाहीं. आपल्या घरच्या भांडणांत परकीयाची मदत घेऊन आपण विजयी होण्याची लालसा धरणं योग्य नाहीं आपल्या भाईबंद शत्रूचा पाडाव होऊन आपलं कार्य साधेल अशी एखादी युक्ति आपण काढली पाहिजे. ”

मंत्री अमरसिंहजींचें हे भाषण ऐकून भीमदेव म्हणाला, “ तर मग उपाय तरी कोणचा योजावा ? पृथ्वीराजाचं पारिपत्य तर झालंच पाहिजे. यावर युक्ति काढणं हें तुमचं काम आहे. आह्मी आपल्या भुजबळदर्पानं पृथ्वीराजाला जिंकू शकू असं तुम्हाला वाटतं काय ? ”

मंत्री म्हणाला, “ सरकार, या बाबतींत सेनापतींचीच सल्ला घेणं इष्ट आहे ! ”

सेनापति म्हणाला, “ महाराज, आमचं सैन्य जरी कोणच्याच बाबतींत कमी दर्जाचं नाहीं, तरी पृथ्वीराजाच्या समशेरीशीं टिकाव धरण्याला कमजोर आहे. त्याच्या सामताच्या सैन्याशीं जरी आह्मी लढलों, तरी त्याच्या चंदवरदासीशीं टक्कर देणारा आमच्यांत कोणीच नाहीं. ता मोठा विचारशील, धूर्त, नीतीवान आणि शूर आहे. इतकंच नव्हे तर तो पृथ्वीराजाचा प्रत्यक्ष उजवा हात असल्यामुळे पृथ्वीराजाच्या चव्हाणी समशेरीपुढें आमचा टिकाव लागणं कठीण आहे आह्मी जरी प्रथम विजयी झालों, तरी त्याच्या युक्तीनें पुन्हां आम्हांला पराजित होण्याची भीति आहेच ! ”

# त्रयोदश काण्ड.

यावर भीमदेव म्हणाला, " मग यावर तोड तरी काय ? "

सेनापति म्हणाला, " मंत्री अमरसिंहजीच म्हणण जरी मला पटतं तरी शहाबुद्दीन घोरीची मदत आपण घ्यावी अस मला वाटत। भरतखडात स्थिरस्थावर होऊन राहण्याची यवनाची शक्ति नाहीं आह्मी त्याच्या साह्यान पृथ्वीराजाचा प्रथम निकाल उडवून, मागून त्याला इथून हाकून लावू म्हणजे झाल. "

ही गोष्ट ऐकून बहुतेक सामन्त जरी खुष झालें, तरी त्यापैकीं एक सामत म्हणाला, " सरकार, सिह जेव्हां एकटाच शिकार करून त्यावर ताव मारतो तेव्हाच तें भोजन त्याला मोठ प्रिय वाटत ! "

भीमदेव बोलला, " आपल आणि दुसऱ्याच भोजन सिह एकटाच गट्ट करून टाकतो ! "

यावर सेनापति म्हणाला, " भारती वीराच्यापुढें छाती ठोकून उभं राहण्याची कोणाची ताकत आहे ! आपण चतुर दूताला धाडून शहाबुद्दीनाला वळवून घ्यावा ! आह्मी त्याच्या साह्यान पृथ्वीराजाचा मुकाबला करू व नतर घोरीला कांही द्रव्य देऊन त्याला जाण्यास सांगू. तो नच ऐकेल तर आमची तरवारीची धार त्याला इथून हाकून द्यायला समर्थ आहेच ! "

सेनापति व कांही सामंत यांच्या सल्ल्यानें एका चतुर दूताची निवड करण्यांत आली. त्याचें नाव मकवान असें होतें. राजानें त्याला " हे

वीरा, मी इथें जें कांहीं करतों आहें तें सर्व फक्त इच्छिनीच्या प्राप्ती-करताच आहे. तें रमणीरत्न जों पर्यंत माझ्या हस्तगत होणार नाहीं, तों पर्यंत माझ्या हृदयातली व्यथा दूर होणार नाहीं. माझ्या मनांतलं खर दु:ख तू शहाबुद्दीनाला नीट समजावून सांग म्हणजे तो मला मदत करायला तयार होईल. तू जात्या मोठा बुद्धिवान व चतुर आहेस हें सांगण्याची अवश्यकता नाहीं. ''

इतकें बोलून भीमदेवानें मकवान्याची रवानगी केली. त्याच्या बरोबर, शहाबुद्दीनला नजर करण्यासाठी--बरेचसे उत्तम घोडे, छत्रचामर, जडजवाहीर वगैरे दिलें त्याच्याबरोबर दिलेल्या पत्रात असें लिहिलें होतें की, '' आपण आपल्या फौजेसह दिल्लीवर चालून यावें व मी नागो-रावर ससैन्य जाऊन पृथ्वीराजाला नामशेष करतों. अशा तऱ्हेनें आपण उभयता चव्हाणी वंशाचा फन्ना पाडून टाकू व विजयी चव्हाणी सम-शेरीचा नक्षा उतरू. ''

पत्र व नजराणा घेऊन मकवाणा निघाला. तो गिझनीला गेला तेव्हा त्याला असें समजलें कीं, शहाबुद्दीन सिंध देशात गेला आहे; तेव्हां तो मग तिकडे गेला. कांहीं दिवसांनी तो बटिंडा संस्थानच्या सरहद्दीवरील घोरीच्या छावणीपाशी जाऊन पोंचला. त्यावेळी घोरीचा दरबार त्याच्या खास डेऱ्यांत भरलेला होता. तेथें त्याचे मोठे मोठे वीर सरदार भाषणें करीत होते. त्याच्यामध्यें मुख्यत्वेंकरून—तातारखां,

मासफखां, हुजाबखां वगैरे सरदार होते. शहाबुद्दीन पुढील स्वारीचा आपला मार्ग आंखीत होता, इतक्यात त्याला मकवाना आल्याची खबर पोंचली. मकवान्याला दरबारांत घेऊन येण्याचा हुकूम केला. त्यानें दरबारांत—मजलशींत जाऊन कुरानिसात केल्यावर, आपण कोण आहोंत तें सांगितलें. तो म्हणाला, " हुजूर, मी भोलाराय भीमदेवाचा दूत आहें. कांहीं विशेष कामासाठीं आमच्या मालकांनीं मला आप- ल्याकडे धाडला आहे. राजकारणांतल्या मोठाल्या घडामोडींची चिकित्सा आपणाप्रमाणें आजकाल फार थोड्यानां समजते अशी माझी सम- जूत आहे. "

शहाबुद्दीन म्हणाला, " तुम्हारा मतलब क्या है ? साफ—साफ कहो ! "

मकावानानें भीमदेवाचें पत्र पुढें ठेविलें. मुनशीनें तें वाचलें. त्यांतला आशय, त्यानें शहाबुद्दीनला समजावला. आशय ऐकून, घोरी रागानें लाल झाला. त्याचे ओंठ हलूं लागून त्याचे बाहु स्फुरण पावूं लागले. त्यानें क्रोधानें आपलें धनुष्य उचलून म्हटलें, " मै खुद अकेले ही काफिरोंको बरबाद करूं गा. मै जबतक हिंदोस्तानपर कब्जा कर काफिरोंको नेस्तनाबूद न करलूं तबतक खुरासान तख्तपर न बैठूं ! "

शहाबुद्दीनच्या मोठमोठ्या सरदारांनीं त्याच्या बोलण्याला रुकार दिला. तातारखां, पिरोजखां, उजबकखां, रुस्तुमखां वगैरेंनीं घोरीची

मोठी वाहावा करून म्हटलें कीं, " वाकई सल्तनकी हुकमत आपनीही मर्दानगीसे होता है ! दुसरे दूतेपर खेती नही होती. " यावर शहाबुद्दीननें मोठ्या ऐटीनें म्हटलें, " बेशक, आले ख्यालातके दानिशमंदोने भी ठीक कहा है कि ' सखावत् जग हुनर और जर जेवर जोरू जमीन, साझेग नहीं होते. ' यह जमीन मर्दानगों की है. काहिल इसे नहीं रख सकते. भला भीमदेव क्या शेखी हांकता है ! "

शहाची अशी ही गर्वपूर्ण भाषा ऐकून मखवाना म्हणाला " शहा, भीमदेव कांहीं एखादा क्षुल्लक राजा नाहीं. तो मुसलमानांना केव्हांहि भारीच आहे. "

शहा म्हणाला, " हां, हां, मै खूब जानता हूं कि वह मुसलमानोंकी खबर ले सकता हैं. अच्छा, पहिले पृथ्वीराजकी खबर लेकर, पिछे भोलाराय भीमदेवकी भी खबर लूंगा. "

हे शद्ब मकवानाला सहन झाले नाहींत. तो म्हणाला, " बोरी शहा, ज्या वेळीं भीमदेवाची सेना ह्या भूमीवरून युद्धाकरतां रणमदानं चालू लागते त्यावेळी नागराज वासुकीसुद्धां घाबरून जातो. जालधर, वंग, तेलंग, कोंकण, कच्छ, परोट, मराठे वगैरे कोणीहि त्याच्याशीं साम्ना द्यायला धजत नाहींत. आमच्या भीमदेवानें अबूगडावर आपला झेंडा नुकताच फडकावून—यादव आणि वाघेले यांनां पादाक्रांत केले आहेत. ज्याला ब्रह्मदेवानं मोठ्या कर्तबगारीनं मुद्दाम निर्माण केलं आहे त्याला कोणीहि जिंकणं शक्य नाहीं. "

## त्रयोदश काण्ड.

मकवान्याच्या तोंडची अशा तऱ्हेची गर्वभरित भाषा ऐकून शहाबुद्दीनाचा राग भडकला. त्यानें त्याला ठार मारण्याचा हुकूमहि केला; पण ' दूताला ठार मारणें राजनीतिच्या विरुद्ध आहे ' असें जेव्हां निसुरतखानानें त्याला नीट समजावून सांगितलें तेव्हां तो गप्प बसला. त्यावेळीं घोरीनें आपली समशेर अर्ध्या म्यानाच्या बाहेर खेचलेली बघतांच एक सभासद बोलला " अगरचे दूत को मारना मना है, पर जरा दूत को भी होश सम्हाल कर बोलना चाहिये ! अगर हुजूरनें उस्की आबरूशी नकी होती तो मै यहापर बारान्धाराहि कर देता. "

हें ऐकून मकवानाच्यानें राहावेना. त्यानें सरकन आपली तरवार म्यानांतून उपसून त्या सभासदाचे जागच्याजागीं दोन तुकडे केले. हें पाहून घोरीनें आपल्या धनुष्यावर बाण चढवून लागलींच तो मकवान्यावर सोडला. त्याबरोबर मोठ्या तिरीमिरीनें मकवान्यानें हेजरखां आणि हुजाबखां यां सारख्या दोघां उत्तम सरदारांना आपल्या तलवारीनें कापून काढून आपलाहि देह तेथेंच विसर्जन केला.

मकवाना मेल्याची खबर भीमदेवाला समजल्यावर त्याचा क्रोध त्याच्या छातींत मावेनासा झाला. त्यानें तावडतोब सेनापतीला बोलावून ती हकीकत सांगितली तेव्हां त्यानेंहि आपल्या समशेरीचा तडाखा शहाबुद्दीनाला दाखविण्याची सल्ला दिली. त्यावेळीं भीमदेव पृथ्वीराजाचा सूड घेण्याचे विसरून आऊन घोरीवर दौड करून आपल्या

विचारात गुग झाला. जागृतावस्थेंत, झोंपेंत, उठता, बसतां, रात्रीं, दिवसां, अक्षय त्याला घोरीचा 'घोर लागला. जोपर्यंत घोरीचा बदला घेतला नाहीं, तो पर्यंत राणीवशांत आपलें तोंड दाखवायचें नाहीं असाहि त्यानें ठाम निश्चय केला. त्यानें आपल्या सामंताना ससैन्य येण्याची आज्ञा देऊन, सेनापतीला त्याच्यासह घोरीवर चाल करून जाण्याचें आज्ञापत्र दिलें. आपलें सैन्य सुसज्जित करून, कूच करण्याची राजाज्ञा केव्हा होते तिची सेनापती वाट पाहात उभा राहिला भीमदेवानें कूच करण्याची सेनापतीला आज्ञा दिली खरी, परंतु तो राजमंदिरांतून बाहेर पडला तेव्हा त्याला अपशकून होऊं लागले. अग्निनारायणानें प्रथम राजमंदीरावरच कृपा केली. आग लागलेली दृष्टीस पडली असताही, भीमदेवानें त्या अपशकुनाला तुच्छ मानून, शहाबुद्दीनाला आपल्या समशेरीचा तडाखा दाखवण्याचें त्यानें निश्चित केलें.

बटिंडावर चाल करून जाण्यासाठीं शहाबुद्दीनची सेना ज्या प्रमाणें तळ देऊन पडली होती त्याच प्रमाणें त्याच्या सेनेची दुसरी एक तुकडी पृथ्वीराजावरहि स्वारी करण्यासाठीं धाडण्यांत आली होती. पृथ्वीराज शिकारीचा अत्यंत शोकी असल्यामुळें तो त्या छंदांत नेहमीं आपल्या सामंतांपासून एकटाच मृगांच्या मागें रानावनांत दौडत जात असे हें मागें वाचलेले वाचकांस आठवत असेलच. त्या त्याच्या एकाकी स्थितीचा फायदा घेऊन त्याला ठार मारून टाकण्यासाठींच घोरीने

आपल्या वर सांगितलेल्या सैन्याच्या तुकडीला टपून बसण्यासाठीं रवाना केलें होतें. शहाबुद्दीनाचा हा बेत पृथ्वीराजाला आगाऊच समजला असल्यामुळें तो फार सावधपणानें वागत होता.

खारुडपुरावर शहाबुद्दीनची सेना तळ देऊन पडली असता, पृथ्वीराज नागोरमध्यें एकटाच होता. पृथ्वीराजाच्या गुप्त हेरानीं जेव्हां त्याला भीमदेवाचें घोरीवर चालून जाणें आणि घोरीचें पृथ्वीराजावर चालून येणें याची बातमी नागोर मुक्कामीं दिली, त्या वेळीं तो मोठ्या फिकीरींत पडला. त्यावेळीं नागोरास अवघें आठ हजार सैन्य पृथ्वीराजापाशीं होतें, म्हणून त्यानें दिल्लीहून अधिक चार हजार सेना बोलाविली. ती सेना त्याला येऊन मिळाल्यावर तो शत्रूशीं सामना देण्यासाठीं तेथेंच व्यवस्थितपणें तयार राहिला कांहीं काळानें त्यानें सारुडपुरावर ससैन्य चाल केली तेव्हां तेथें त्याला भीमदेवाच्या सैन्याचा झेंडा फडकत असलेला दिसला. तें पाहून कैमाषानें पृथ्वीराजाला म्हटलें, " महाराज, ही वेळ दोन्ही शत्रूंचा निःपात करण्यास ठीक आहे." पृथ्वीराजाला ही कैमाषची सूचना पसंत पडली. त्यानें आपल्या मुख्य मुख्य सरदारांचें मत घेऊन चाल करून जाण्याचा बेत निश्चित केला.

पृथ्वीराजाच्या सरदारांत—चामुंडराय, जैतपामर, देवराय, बग्गरीबडा गुजर वगैरे जे मुख्य होते त्यांनीं शपथपूर्वक असें सागितलें कीं,

" राजन्, आम्हीं सर्व मिळून आज दोन्ही शत्रूना पादाक्रांत करून टाकतों. कैमाषाचं म्हणण आम्हां सर्वांना पसंत पडलं आहे. आम्हा सर्वांचे देह स्वामीकार्यार्थच उत्पन्न झालेले आहेत. "

हें भाषण ऐकून पृथ्वीराजानें तावडतोब आपल्या सैन्याचे दोन विभाग केले. त्यानें आपण स्वतः एका विभागाचें सैनापत्य स्वीकारलें व दुसऱ्या सैन्याविभागावर कैमाषाची सेनापतीच्या जागी नेमणूक केली. त्याला भीमदेवावर चालून जाण्यास सांगून आपण स्वतां चतुर दूत बरो-बर घेऊन शहाबुद्दीन घोरीच्या सेनेवर चाल करून जाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें कैमाष ससैन्य चाल करून नागोराहून निघाला व पृथ्वीरा-जानेंहि शहाबुद्दीनच्या सैन्यावर चाल करून जाण्यास तेथून कूच केलें.



# चतुर्दश काण्ड.

## भीमदेव आणि कैमाष.

तुलसी जे कीरति है, पर कीरति को खोय ।
तिनके मुइं मासि लगि हे, मुएन मिटिह धोय ॥

—तुलसीदास.

'कामातुराणां न भयं न लज्जा' असें जें म्हटलें आहे तें अगदीं सत्य आहे. कामीजन काय करणार नाहीं! कामीजनाला लोकलज्जा आणि अपयश यांची भीति मुळीच वाटत नाहीं. तो आपल्या अभीष्टप्रात्यर्थ काय हवें तें करतो. भीमदेवाची स्थिति यावेळीं दुखावलेल्या सापासारखी झालेली होती. पृथ्वीराज आणि शहाबुद्दीन यांच्या वैराग्नींत तो एकसारखा तडफडत होता. अबूगडावर जाते वेळीं केव्हा केव्हा त्याला पृथ्वीराजाची आठवण होई व केव्हां केव्हा तर तो मकानाच्या अपूर्व आत्मोत्सर्गानें विव्हळ होई! काय होईल, तें होवो या सर्वांचा सूड उगवलाच पाहिजे असें त्यानें या वेळीं निश्चित ठरविलें होतें. त्याला इच्छिनीकुमारीची आठवण होई व त्याबरोबरच तिला धर्मपत्नी करणाऱ्या पृथ्वीराजाचीहि होई. इकडे कैमाष नागोराहून पूर्ण

तयारीनें निघाला होता. भीमदेवाला ही बातमी समजल्यावर त्यानें विचारी मन्त्र्यांना बोलावून, त्याचा प्रतिकार कसा करावा याबद्दलचें खलबत सुरू केलें. कैमाष आपल्यावर चालून येतो आहे असें समजल्याबरोबर भीमदेवानें आपल राजमंत्री आणि मुख्य मुख्य सेनानी याचा दरबार भरविला. त्या दरबारात—रामरण प्रमार, गरगुठीर झाला, वीरदेव वाघेला, गंग डमिराज पुरोहित, वमवुर वाघेला व अमरसिंह सेवरा हे मुख्य होते त्या सभेत पृथ्वीराज आणि शहाबुद्दीन ऱ्या दोघांच्या सैन्यावर चाल करून जाण्याचा बेत ठरला; परतु काही सरदाराच्या मतानें हा विचार आदूरदर्शीपणाचा असल्यामुळें—सारंगदेव व पैरभंराव त्यानी आपलें असें मत दिलें कीं, ‘ प्रथम पृथ्वीराजाचें आपण साह्य घेऊन परकीय शत्रूला नामोहरम करावें आाणि नंतर पृथ्वीराजाचा व आपला घरांतला तंटा मिटवण्यासाठीं आपण पृथ्वीराजाचा समाचार घ्यावा. ’

पैरभराज म्हणाला, “ खर पाहिलं असतां, आपल्या आपसांतल्या भांडणात न्यायदृष्ट्या पाहिलें तर, सलम प्रमारान इच्छिनीकुमारीला पृथ्वीराजाला दिली यात त्याचा कांहीं दोष नाहीं त्यानें आपली ज्येष्ट कन्या मदोदरी हिला आमच्या भोलाभीमदेवाला दिली असून, इच्छिनीला पृथ्वीराजाला दिली यांत त्यानें काय अपराध केला ? ”

झालाराव आणि दुसरा एक सरदार यांनींहि आपलें असें मत दिलें कीं, “ पृथ्वीराजाचं पूर्वीच वैर यावेळीं विसरून परधर्मीय विदेशी

शत्रूचा मुकाबला एकमतानं करावा हेंच योग्य आहे. विदेशीयांनीं या भरतभूमींत आगमन करणं अत्यंत अमंगलकारक आहे. आपला वैरी लहानसा अशक्त असला तरी त्याची उपेक्षा कधींच करूं नये अशी राजनीति आहे अग्नीची एक अल्प ठिणगी प्रचंड वनाला दग्ध करून टाकते. भगवान् हनुमंताच्या पुच्छाग्राच्या अग्नीनं सर्व लंकापुरी दग्ध करून टाकली हें तर महाशूरच आहे."

याप्रमाणें भीमदेवाच्या कांहीं सरदारांचीं मतें जरी नीतीला धरून होतीं, तरी वैरवश झाल्याकारणानें मंत्री अमरसिंहाला तीं पसंत पडलीं नाहींत. तो म्हणाला, "असं करण्यांत आमचा अपमान आहे. मी मंत्रबळानं कैमाषाला आणि शस्त्रबळानं शहाबुद्दीनाला पराजित करीन."

अमरचंदाचे मित्र भैरवभट्ट आणि चरणचंद यांनीं त्याच्या म्हणण्याला दुजोरा दिला. विव्हल झालेला भीमदेवहि त्यांच्या मताला अनुकूळ झाला. विरहाग्नीनें कांहींशी व कांहींशी तात्कालीन जादू-टोण्यावरच्या भरंशाच्या आसक्तीनें भीमदेवाची मती भ्रष्ट झाली. राजकन्येसाठीं लढून विजय मिळवणें म्हणजे स्वर्गप्राप्ती करून घेणेंच त्याला वाटत असून, पराजित होण्यांत मोठा अपमान आहे अशी त्याची समजूत झालेली होती. अमरसिंहाच्या म्हणण्याला रुकार देण्याला हेंहि एक त्याला कारण झालेलें होतें. आपल्या बरोबरीच्या राजवर्गात झालेला

अपमान आणि इच्छिनीकुमारीची अप्राप्ति या दोन्ही गोष्टी भीमदेवाला एकसारख्या दुःसह झाल्या होत्या. त्यामुळें त्यानें पृथ्वीराजाला तोंड देण्याचाच निर्धार केला.

चतुर अमरसिंहानें एक मोठी अजब युक्ति काढली. त्यानें भाटाच्या हातीं मोठें विनयपूर्वक एक संधिपत्र बाबून दिलें. भाटाच्या गोड गोड भुलथापांना कैमाष बळी पडला. भाट कैमाषाकडे जाऊन पोंचल्यावर त्यानें त्याची प्रथम ओतप्रोत स्तुति केली व नतर त्याच्या पुढें सधिपत्र ठेविलें. त्यानंतर बराच शिष्टाचार झाल्यावर भाटानें एका रूपवती क्षत्रिय कन्येची तसबीर कैमाषापुढे ठेवून तिची प्राप्ति करून देण्याचें त्याला अभिवचन दिलें. ती तसबीर पाहातांच कैमाष अगदीं मदनविव्हल होऊन गेला. तो त्या भाटाच्या इतका आधीन झाला कीं, ती स्त्री लवकर आणून देण्याबद्दल तो त्याची प्रार्थना करूं लागला.

सर्व गोष्टी सरळ चालल्या होत्या. भाटानें लाली नांवाच्या क्षत्रिय कन्येस आणून हजर केली. तिला पाहून कैमाष इतका सुप्रसन्न झाला कीं कांहीं पुसूच नये. त्यानें भटाला त्याच्या कामगिरीबद्दल मोठें बक्षीस देऊन त्याचा मोठा धन्यवाद गाइला. कैमाष त्या स्त्रीशीं इतका रत झाला कीं तो आपल्या कर्तव्याला विसरला इतकेंच नव्हे, तर तो स्वतः-लाहि पार विसरून गेला. अशा तऱ्हेनें लगाम ढीला पडल्यामुळें त्याच्या हाताखालचे सरदारहि, कर्तव्यमूढ झाले. ज्याला जो मार्ग अवडला त्या

मार्गानें ते निघून गेले. कोणी कोणास पुसेनासा झाला. सैन्याची मोर्चे-बंदी, घोडदळाचे धावे आणि सैन्यशिक्षणाचा प्रघात, या सर्व गोष्टी नामशेष झाल्या. जेथें शत्रूवर चढाव करून जाण्याची सेनानायकाची तयारी झाली होती, तेथें सेनापतीवरच लाली नांवाच्या स्त्रीच्या नेत्रकटाक्षाचा मारा सुरू झाला. ' नारिनयनशर काहि न लगा ' असें जें तुलसीदासानें म्हटलें आहे त्याची सत्यता येथें दृष्टीस पडली.

इकडे कैमाष कर्तव्यमूढ होऊन कामिनीच्या दृढालिंगनांत बद्ध झाल्याची संधी साधून, भोळा भीमदेवानें पृथ्वीराजाच्या सेनेला त्रास देण्याची सुरुवात केली. नागोरांत भीमदेवाच्या नांवाची द्वाही फिरली. ही हकीकत, पृथ्वीराजाच्या कांहीं हितेच्छूनीं चंदावरदायीच्या कानांवर घातली. त्याच्या पूर्वीं एके दिवशीं चंदवरदायीला कैमाष एका स्त्रीच्या नादीं लागून कर्तव्यमूढ झाल्याचें स्वप्न पडलें होतें; परंतु त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें होतें. खरी हकीकत समजल्यावर तो कांही सैन्यानिशीं नागोरावर जाऊन थडकला. तेथें त्यानें कैमाषाचा सर्व प्रकार स्वता अवलोकन केला. चंदावरदाईनें कैमाषाला पुष्कळ बोध केला; परंतु पालथ्या घागरीवर पाणी पडल्यामुळें, तो जरी हताश होऊन स्वस्थ बसला, तरी त्यानें नागोरच्या चहूंकडूनीं उत्तम मोर्चेबंदी करण्याचें काम सुरू केलें. त्याबरोबरच त्यानें कैमाषाचें मन वळण्याचाहि प्रयत्न सुरूच ठेवला होता.

चंदावरदायी नागोरला ससैन्य आल्याची बातमी अमरसिंहाला समजल्यावर तो स्वतां तेथें जाऊन राजनीतिद्वारें कैमाषाचा पराभव करण्याच्या युक्त्या लढवूं लागला. त्यानें अनेक डावपेच केले; परतु चंदावरदाईनें ते सर्व हाणून पाडले; चंदावरदाईनें मोठ्या चातुर्यानें कैमाषाचें मन त्या स्त्रीपासून पराङ्मुख केलें व त्याला त्यानें तिचा कट्टा वैरी बनविलें. ती स्त्री भीतीनें तेथूनच पळून गेली. कैमाष आपल्या पुरा कब्ज्यात आला असें पाहून चंदावरदायीनें त्याच्याशीं भाषण करण्यास सुरवात केली. चंदवरदायीला सन्मुख पाहून कैमाष लज्जित झाला. त्याला त्याच्या कर्माचा पश्चात्ताप झाला. त्यानें चंदावरदायीची क्षमा मागून जेव्हां आपल्या हातून घडलेल्या कर्माबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली, तेव्हां चंदावरदाई म्हणाला, "कैमाष, यांत तुमचा दोष नाहीं. हा जगाचा असाच परिपाठ आहे. कामदेवाला कोणी जिंकलें आहे! प्रत्यक्ष पुरुषोत्तम रामचंद्रानेंही सीतादेवीच्या तोडरांचा रुम झुम् शब्द ऐकून म्हटलें होतें कीं, "हा मदनदुन्दुभी कानांना फारच गोड लागतो. ही त्याची नौबद विश्वविजयाचें गाणें गात असते." तुम्ही आणि आम्ही तर काय, यःकश्चित् मानवश्रेणींतले साधारण प्राणी आहोंत. झालें तें झालें! आतां या पुढें सावध राहव म्हणजे झाल! झालेलं विसरून पुढचं सुधारणं हेंच शहाण्याचं खरं कर्तव्य आहे. आपल्या अंगच्या रणकौशल्यानं भीमदेवाला चणे चारून त्याच्या नाकाला चुना लावूं आणि अशा तऱ्हेनें आपल कर्तव्य रक्षण करूं म्हणजे झालं."

## चतुर्दश काण्ड.

अत्यंत बिकट प्रसंगातून चंदावरदाईनें कैमाषाचा कसा बचाव केला त्याची हकीकत रासग्रंथात संपूर्ण ग्रथित केलेली आहे. कैमाषानें जेव्हां पश्चात्तापानें चंदवरदायीची क्षमा मागितली तेव्हा त्यानें त्याला प्रोत्साहन देऊन भीमदेवाच्या पराजयानें आपली नामोष्की धुऊन काढण्यास सांगितलें.

इकडे दिल्लींत जेव्हां कैमाषाच्या शत्रुवशतेची बातमी पोंचली तेव्हा तेथें मोठी गडबड झाली. कन्ह, चामुंडराय, चंद, पुंडीर वगैरे सर्व सरदारानी पृथ्वीराजाला आजमेरास एकटाच सोडून नागोरकडे कूच केला. ते सर्व येऊन मिळाल्यावर कैमाषाला उत्साह आला. त्यानें तावडतोब जय्यत तयारी करून मोठ्या सावधपणानें आपल्या बलिष्ट सेनेला, भीमदेवाच्या मोकाल्यासाठीं चाल करून जाण्याची आज्ञा दिली. भीमदेव तो प्रसंग जाणून असल्यामुळें पहिल्यापासूनच सावध होता. त्याची सेना अष्टौप्रहर सज्ज असे. चंदवरदायीनें जेव्हां आपल्या बुद्धिबलानें कैमाषाला मदनपराङ्मुख करून अमरसिंहाच्या युक्तीला धूळ चारली तेव्हांपासून भीमदेव घाबरून जाऊन मोठ्या बंदोबस्तानें अटोकाट फौजेच्या अंतरंगांत राहूं लागला. कैमाषाची थोडीशी फौज जेव्हा भीमदेवावर हल्ला करण्यास निघून विश्रांतीसाठीं एका तळावर मुक्काम करून राहिली, त्यावेळीं भीमदेवानें, सात घटका रात्रीं त्या फौजेवर एकदम अचानक हल्ला केला. कैमाषाची सेना जरी संख्येनें

अल्प होती, तरी शौर्यानें विलक्षण असल्यामुळें; भीमदेवाच्या चढाईची बातमी लागतांच ती चित्त्याप्रमाणें तयार झाली. दोन्ही सैन्यांच्या तरवारींची खणाखणी सुरू झाली. तीर, भाले, बरच्या, तबक, कट्यारी, बिचवे वगैरे शस्त्रें एकमेकांच्या रुधिराचे पाट वाहवूं लागलीं. दोन्ही पक्षांकडील शूरवीर या असार संसाराचा त्याग करून स्वर्गभुवनाचा आश्रय करूं लागले. मोठाले मस्त हत्तीहि वीरांच्या शस्त्राघातानी कोसळून पडणाऱ्या गिरिशिखरांप्रमाणें जमीनदोस्त होऊन रक्त प्रवाहाचे बांध होऊं लागले. बाजीखान नांवाचा जो एक भीमदेवाचा पांच हजारी महा बलाढ्य सरदार होता तो या युद्धांत आपल्या सर्व लोकांसह भीमदेवाच्या कामीं पडला.

आनंदनाम संवत्सर विक्रम संवत ११४४ मधील एका अष्टमीचा चंद्रोदय झाल्यावर हें युद्ध पुन्हां सुरू झालें. एकीकडून कैमाषाचें अल्प सैन्य शिरजोरपणानें धांवून गेलें व दुसरीकडून भीमदेवाचें प्रचंड सैन्य चाल करून आलें. या प्रसंगीं कैमाषाच्या सैन्याचा सेनापती चामुंडराय होता. त्यानें या प्रसंगीं आपल्या बाहुबलाचा अद्वितीय पराक्रम प्रकट केला. भीमदेवाची एकसष्ट हजार सेना व कैमाषाची वीस हजार सेना त्यांचा पराक्रम पाहून थक्क झाली. मोठाले वीर त्यांच्या पराक्रमाचें कौतुक करूं लागले. मोहनसिंह, परिहार, माहुरराय, त्रिहुराय, पज्जुनराय वगैरे सरदारांनीं शत्रुसेनेचा संहार चालविला होता. पृथ्वी-

# चतुर्दश काण्ड.

राजाकडील—चामुंडराय, अैतसी, बडागुजर, रामराय, कन्ह चव्हाण, पज्जूनराय, प्रसगराय, खीची, चंद, पुंडीर, महनासिंह, मारू, देवराज, बगारी, सलप, त्रिंगुरराय वीरसिंह वगैरे सरदार आपल्या सैन्यासह कैमाषाची मदत करीत होते. सारंगदेव, नरसिंह, वीरसिंह वगैरे सरदार भीमदेवाची बाजू राखीत होते. त्या चांदण्यारात्रीं वरील सरदाराच्या तरवारीचें तेज प्रच्छन्न प्रगट होत होतें. त्यांच्या तरवारीचे वार ज्या स्वारावर होतें ते घोड्यासकट कांपले जात. मत्त हत्तींचीं गंडस्थळें विदारण करून रक्तमासांचा गच्च चिखल करण्यांत गुंतलेले ते उभय पक्षांचे वीर रणमदानें अगदीं धुद होऊन गेलें होते. दोन्ही सैन्यांशीं लढत असतां भीमदेवानें जरी कच खाल्ली होती तरी आपल्या सैन्याचा रणोत्साह वाढविण्यासाठीं त्यानें आपल्या हत्तीवर आरूढ होऊन गंभीर गर्जना चालविली होती. रामराय गुजराच्या दृष्टीस तो पडतांच, चालुक्याच्या सैन्याला कांपीत तो त्याच्याजवळ येऊन ठेपला. त्यानें भीमदेवाच्या शरीर संरक्षकांवर असा एक तरवारीचा हात मारला कीं त्या सपाट्यासरसा तो कापला जाऊन भीमदेवहि जमीनीवर आदळला. त्याचा क्रोधाग्नि त्यामुळें शिखराला गेला. तो सावडतोच दुसऱ्या एका मत्त हत्तीवर बसला व जीवाची आशा सोडून कैमाषावर धावून गेला. त्याचें सैन्यहि त्याच्या मागें वेगानें लोटलें. कैमाषावर आलेला हा बिकट प्रसंग पाहून, चामुंडरायानें आपला मोर्चा सोडला व तो कैमाषाच्या

मदतीला धावून गेला. कैमाषाचा मोड होताच त्याची सेना उधळली. इकडे भीमदेव व तिकडे कैमाष आणि चामुंडराय यांनीं आपल्या स्वामीकार्यार्थ स्वप्राणांना तुच्छ मानून जीवापाड हत्याराच्या फेकी सुरू केल्या. क्षणमात्रांत वीररसाची जागा करूणरसानें व्यापलेली दिसूं लागली. तें घनघोर युद्ध पांच घटकांपर्यंत एकसारखें चाललें होतें. अखेरीस भीमदेवाची सेना पराजित होऊन पळू लागली. पृथ्वीराजाचा विजय झाला. दोहींकडचें सैन्य सोळा हजारांवर पतन पावलें. त्यापैकीं तेरा हजार भीमदेवाचें आणि तीन हजार पृथ्वीराजाचें होतें. पृथ्वीराजाचे सलपराम, मोहल, मल्लीन, महीराव, सहदेव वगैरे सरदार धारातीर्थी पडले. अबूवर पृथ्वीराजाचें राज्य संस्थापित झालें व तेथें जैतसी पवाराला सुभेदार नेमण्यांत आलें.



# पंचदश काण्ड.

## चित्ररेखा.

नारि नयनसर काहि न लागा ।
राज पाई मद काहि न जागा ॥

—तुलसीदास.

अमरसिंह महाराजांचा दरबार सरदार मानकऱ्यांनीं अगदीं गजबजून गेला होता. अमरसिंहहि कांहीं वेळानें येऊन सिंहासनावर बसल्यावर त्यानें आपल्या प्रधानांना सर्व तऱ्हेच्या राजकारणाचे प्रश्न केले व त्यानीं त्याचीं समर्पक उत्तरें दिलीं; नंतर नाहरसिंहासंबधानें बराच खल झाल्यावर चंदनसिंह म्हणाला, " न्यायी राजाची प्रजा सदोदीत न्यायीच राहाते कपटी राजाची प्रजा कपटी असते. 'यथा राजा तथा प्रजा' ही म्हण आबाधित चालणारी आहे. पापी राजाची कारकीर्द प्रजेला मोठी दुःसह होऊन प्रजा अधःपदशाला जाऊन पोंचते."

अमरसिंह म्हणाला, " चंदनसिंह, नाहरसिंहाला देहांत प्रायश्चित्त देण्याचा आमचा इरादा आहे. त्यानें केलेल्या अनेक दुष्कृत्यांचा तपास केला आहे. सुंदरी दासीनं त्याच्याबद्दलच्या ज्या ज्या हकीकती सांगि-

तश्या त्या त्या सर्व आमच्या प्रत्ययाला आल्या आहेत. आम्हीं त्याच्या घरीं जाऊन, त्यानें बलात्कारानें हरण करून कैद करून ठेवलेल्या सर्व स्त्रियांना मुक्त केल्या आहेत. त्याचें तें अपवित्र घरही जाळून खाक करण्याचा आम्ही हुकूम सोडला आहे. आज आमची प्रकृति जरा नादुरुस्त झाली आहे, सबब दरबार बरखास्त करावा अशी आमची इच्छा आहे."

इतकें बोलून अमरसिंह सिंहासनावरून उठणार तोंच चोपदारानें 'एक सरदार आला असून, तो महाराजांची भेट घेण्याची इच्छा करतो आहे' अशी ललकारी दिली. त्याबरोबर त्याला आणण्याची परवानगी देण्यांत आली. लौकी सरदारानें दरबारांत प्रवेश केला. त्याला सिंहासनाजवळ बसण्याची आज्ञा झाली. त्याच्याबरोबर एक सुंदर सुकुमार बालिकाहि त्या दरबारांत आली होती. अमरसिंहानें त्या सरदाराला विचारलें "आपण कोठून आलांत ? ही सुंदर स्त्री कोणाची आहे ?"

सरदारानें सांगितलें, "मी पृथ्वीराजाचा सामंत असून, मला ही स्त्री गख्खरांच्या सरदाराकडून मिळाली आहे. मी पृथ्वीराजांकडून आपल्याकडे आलों आहें. याचें कारण, शहाबुद्दीन घोरीनें जी चाल केली आहे तिचा प्रतिकार करण्यासाठीं मार्गांत आपण त्याला विरोध करावा अशी आमच्या महाराजांची इच्छा आहे. आपल्याकडे येतांना ही सुंदर स्त्री मला आपल्याच हद्दींतल्या गख्खरांच्या तावडींत सापडलेली मिळाली असल्यामुळे व ही निराश्रित आहे यास्तव, मी हिला

आपल्याला अर्पण करतों आहें, म्हणून कृपा करून आपण इचा स्वीकार करावा आणि आमच्या महाराजांच्या निरोपाचा मान राखावा अशी विनंति आहे."

अमरसिंह म्हणाला, "खीची सरदार, मी आपल्या महाराजांच्या म्हणण्याप्रमाणें घोरीला वाटेंत आडवून धरतों पुढें तुमचं तुम्ही पाहून घ्या! तुम्ही या स्त्रीला ज्या अर्थी मला अर्पण केली आहे त्या अर्थी मीं इचा स्वीकार न करणं योग्य नाहीं! हिलाहि मी आपल्या खास राणीवशांत ठेवून घेतों. आतां शेवटीं सांगायचं इतकंच कीं, माझ्या तिघी मुलींचा मी स्वयंवरसमारंभ परवां करणार आहें त्या वेळीं आपण हजर राहण्याची मेहरबानी करावी. चंदनसिंह, यांचा योग्य सत्कार झाला पाहिजे!" नंतर शिरपेच, तुरा, घोड्यांची एक जोडी व एक उत्तम हत्ती इतका नजराणा खीची सरदाराला देण्यांत येऊन दरबार बरखास्त झाला.

ठरल्याप्रमाणें अमरसिंहाच्या तिन्ही मुलींचा स्वयंवर होऊन चंपेनें चंदनसिंहाला माळ घातली, मालतीनें खीची सरदाराला वरिलें आणि केतकीनें वीरसिंहाचें पाणिग्रहण केलं. सर्व समारंभ थाटानें उरकण्यांत येऊन मालतीसह खीची सरदार पृथ्वीराज कडे येण्यास निघाला व चंदनसिंह वीरसिंहाच्या मदतीनें शहाबुद्दीन घोरीचा रस्ता आडवण्यासाठीं सैन्यासह कूच करण्यास राजाज्ञेची वाट पहात राहिला.



# शोडश काण्ड.

## घोरींची स्वारी.



( मालिनी. )

सरळ हृदय ज्यांचे होय सख्यत्व त्यांचे ।
कुटिलहि हृदयांचे होय पित्रत्व साचे ॥
जरि सरळखळांची मैत्रि झाली तरी ती ।
त्वरित वरिल चापी बाण यांचीच रीती ॥

— सौमित्र.

पांडवांच्या राजधानीचें नांव इंद्रप्रस्थ असें होतें, पुढें त्यालाच दिल्ली म्हणूं लागले त्या गोष्टीला आज सातशें वर्षें होऊन गेलीं आहेत. दिल्लीस पृथ्वीराज व कनोजेस जयचंद असे दोघे मावसभाऊ राज्य करीत होते. त्यांपैकीं जयचंद पृथ्वीराजाचा फारच द्वेष करीत असे. तो वयानें लहान असून दिल्लीचा सम्राट बनला व त्याची मुलगी संयोगिता हिला त्यानें त्याच्या इच्छेविरुद्ध हरण करून नेऊन तिला दिल्लीची पट्टराणी बनविली, हाच काय तो पृथ्वीराजाचा अपराध होता असें वर वर पाहणारास वाटेल; परंतु खरी गोष्ट निराळी होती.

# शोडश काण्ड.

पृथ्वीराजाचा उत्कर्ष जयचंदाला सहन होत नव्हता. हरप्रयत्नानें तो त्याचा पाडाव करण्याचा उपाय शोधीत होता. इतक्यात शहाबुद्दीन घोरी दिल्लीवर चाल करून जात आहे असें जेव्हां त्याला समजलें तेव्हा त्याच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं.

जयचंदानें पृथ्वीराजाच्या सामतात राहण्याचें नाकारून त्याला करभार देण्याचेंहि जरी बंद केलें होतें, तरी जयचंद हा आपला मावस भाऊ असून, त्याच्याशीं वैर करून त्याच्यावर क्षुल्लक अपराधासाठीं स्वारी करणें पृथ्वीराजाला पसंत नव्हतें. आपसांत लढाई न होण्याबद्दल पृथ्वीराजानें पुष्कळ खटपट केली; परंतु 'विनाशकाले विपरीत बुद्धि' या न्यायानें जयचंदानें पृथ्वीराजाचें म्हणणें ऐकलें नाहीं. पृथ्वीराजानें त्याची समजूत करण्यासाठीं पुन्हा एकवार दूत पाठविला व आपली भाऊबंदकी परकीयांच्या स्वारीच्या वेळीं विसरून जाण्यास सांगितलें.

"प्रबल पठाण शत्रु भरतखंडाला जिंकण्यासाठीं चालून आला आहे. यावेळीं घरचें भांडण बाजूला ठेवणेंच योग्य आहे. मी यावेळीं जर पराजित झालों तर सर्व भरतखंडात यवनांचा अमल बसेल. यास्तव अशा प्रसंगीं आपण दोघांनीं मिळून त्याचा पाडाव करूं व नंतर आपसातल्या तंट्याचा निकाल करू." अशा अर्थाचें पृथ्वीराजाचें पत्र वाचून जयचंद मोठ्या नाखुशीनें परंतु जनलज्जेस्तव पृथ्वीराजाच्या पक्षानें घोरीशीं टक्कर देण्यास सिद्ध झाला.

## चव्हाणी समशेर !

पृथ्वीराजाचें सैन्यबल फार मोठे होतें. शिवाय देशातील सर्व लहान मोठया सामतांचेंहि लष्कर त्याच्या मदतीला धावून आलें होतें. जयचंदहि जरी त्याला येऊन मिळाला होता, तरी तो पृथक राहूनच लढण्याचें काम करणार होता. कारण, आपल्या जयापजयांत दुसऱ्यानें भागीदार व्हावें अशी त्याची इच्छा नव्हती.

घोरी व पृथ्वीराज यांच्या सैन्याची लढाई जुंपली तुर्की सैन्याचें सेनापतित्व घोरीनें स्वतः पतकरलें होतें. हिंदूच्या सेनेचे तीन विभाग करण्यांत आले होते. त्या तिन्ही विभागांनी घोरीच्या सैन्याला वेढा देऊन फारच जोराची कापाकापी सुरू केली. त्या तीन विभागांचे सेनापति--पृथ्वीराज, जयचंद आणि चितोडचा राणा समरसिंह हे होते. समरसिंहानें सन्याशाप्रमाणें भगवीं वस्त्रें धारण करून कवच घातलें होतें आणि जटाधारी महादेवाप्रमाणें आपल्या जटा मोकळ्या सोडून तो लढत होता.

कोणचा पक्ष विजयी होणार व कोणचा पराजित होणार याचा निश्चय होईना. युद्ध फारच निकराचें चाललें होतें. दोन्ही बाजूचे लोक एकसारखे कत्तल होत होते. तें तिरीरीचें युद्धक्षेत्र " मारो काटो, हाणा मारा ' अशा वीरगर्जनांनीं दणाणून गेलें होतें मध्येंच मुसलमानांच्या " अल्लाहो अकब्बर " अशा गर्जनेनें व मध्येंच " हर हर महादेव " अशा हिंदूच्या गर्जनेनें पृथ्वी आणि आकाश यांमधील पोकळी निनादित होत होती.

## शोडश काण्ड.

त्या भयंकर रणक्षेत्रात रक्तांच्या नद्या वाहू लागल्या होत्या. समरसिंह आपल्या सिंहपराक्रमानें शत्रुसेनेचा व्यूह भेदून जाऊन त्यांना छिन्नभिन्न करीत होता. शत्रूहि त्याच्याशीं निकरानें लढत होते. पृथ्वीराजाची समशेर असंख्य शत्रूंच्या संहारानें पृथ्वीला लालभडक रंग देण्याच्या कामीं अगदीं गुंग झाली होती. त्यावेळीं जयचंदहि आपसांतलें भांडण विसरून जाऊन शत्रुसंहारांत कृतांतालाहि मागें सारील असें दिसत होतें. त्या तिघां रणनौर्‍यांच्या पराक्रमापुढें शत्रुसेनेचा टिकाव लागेना. शत्रुसेना घाबरून पळूं लागली व पृथ्वीराज तिचा दूरवर पाठलाग करीत चालला.

सायंकाळीं हिंदुसेना विजयी होऊन मोठ्या गौरवानें जयाचा डंका वाजवीत स्वस्थळीं आली. तो सर्व प्रांत त्यावेळीं हिंदुसेनेच्या विजयघोषानें दणाणून गेला.

त्यावेळीं जयचंदाची मनःस्थिति फारच चमत्कारिक झाली होती. पृथ्वीराजाच्या नांवाच्या जयघोषाच्या गर्जनेनें त्याचें पित्त बिघडलें गेलें होतें. विजयाच्या आनंदाचा भाग ब्रह्मदेवानें त्याच्या कपाळीं लिहिला नव्हता. त्या युद्धांत पृथ्वीराजाची झालेली प्रशंसा ऐकून, त्याच्या काळजांत दुखूं लागलें. तो आपल्याशींच म्हणाला, " केवढा मी मूर्ख आहे ! मीं त्याला साह्य करून, तो माझा शत्रु असतां, त्याच्या गौरवांत भर घातली. या युद्धांत मीं पदरचें द्रव्य खर्चून स्वसैन्याचा व्यर्थ नाश केला

आणि पृथ्वीराजाचा यशोदुदुंभी वाजविला. नुकसान माझं झालं आणि जयलाभ पृथ्वीराजाला मिळाला ! केवढं हें माझं फुटकं नशीब ! "

आपल्या दैवाला अशा तऱ्हेनें अनेक प्रकारें दोष देण्यानेंहि जयचंदाच्या हृदयांतील मत्सराग्नीच्या ज्वालेची शांतता झाली नाहीं. त्याचा पृथ्वीराजासबंधाचा हेवा—मत्सर द्विगुणित वाढला.

महमद घोरीचा जरी याप्रमाणें पराजय झाला तरी कांहीं कालानें त्यानें पुन्हा दिल्लीवर स्वारी केली. पृथ्वीराजहि आपल्या सामंतासह ससैन्य तितीरच्या युद्धक्षेत्रात पहिल्यासारखा लढण्यास चालून गेला. याप्रसंगीं जयचंद्र मात्र त्याच्या मदतीला आला नाहीं. यावेळी मागच्या वेळेपेक्षांहि भयंकर युद्ध झालें. महमद घोरीनें यावेळीं मोठा सेनासागर आणला होता. हिंदूही आपलें व आपल्या देशाचें स्वातंत्र्य रक्षण करण्यासाठीं त्या तितीरच्या रणभूमीवर आपलीं शिरकमळें हातात घेऊन रणमदानें धावून गेले होते. हिंदुसेनेच्या प्रबळ पराक्रमामुळें यावेळीहि मुसलमानांना हार खावी लागली. महमद घोरी हिंदूच्या वेढ्यात सांपडल्यामुळें, त्याला मागील खेपेप्रमाणें पळून जातां आलें नाही. महमद घोरीचे सर्व शरीररक्षक यावेळीं कापले जाऊन तो पृथ्वीराजाचा बंदीवान झाला होता. त्याला जरी बंदीवान केला होता, तरी पृथ्वीराज त्याला आपल्याबरोबर मोठ्या सन्मानाने दिल्लीस घेऊन आला.

## शोडश काण्ड.

दिल्लीस आल्यावर पृथ्वीराजानें आपला दरबार भरविला. प्रत्येक दरवाज्यावर नग्या समशेरीचे पाहारेकरी त्यावेळीं पाहरा देत होते. या दरबारांत महमद घोरीसंबधानें काय तो विचार ठरायचा होता. त्या दरबारात पृथ्वीराजाचे सर्व सामंत आपापल्या योग्य स्थानी विराजमान झाले असून, पृथ्वीराज सिंहासनावर आरूढ झाला होता. त्याच्यावर शुभ्रकीर्तिदर्शक छत्र धरलेलें असून शुभ्रचवऱ्या चामरधारदार ढाळीत होते. वर हिरव्या रंगाच्या छतावर चांद लटकावलेला असून तो चवऱ्यांच्या मंद हवेंत हेलकवे खात होता.

अशा समयीं महंमद घोरी त्या राजसभेंत खाली मान घालून प्रविष्ट झाला चिंता, लज्जा आणि दुष्कीर्ति यानीं त्याचें मुखमंडल व्याप्त केलें होतें. त्याच्या मनात " या परदेशात, परधर्मीयाच्या हातून आता आपला कोणच्या तऱ्हेचा छल होणार तें समजत नाही ! " अशा भावनेच्या कल्पना उद्भूत होत होत्या. " माझ तातारच राज्य, माझी जन्मभूमी, हीं कोठें आहेत ! येथून फारच दूर आहेत ! आतां माझी जन्मभूमि मातेप्रमाणें माझ्या देहाला आपल्या सुखकर अंकावर कशी पडू देईल ! माझा बाप, माझा आजा—यांचीं कब्रस्तान तर तिथें आहेत. आज मला परदेशांत परकीयांच्या हातून मरण येणार हें केवढ माझ दुर्भाग्य ! दुसऱ्याच्या राज्याचा लोभ धरून आपल जीवित धोक्यात घालण हें मोठ घातकी कर्म आहे. " अशा प्रकारच्या अनुतापाच्या विंचवाच्या नांग्या त्याला एकसारख्या डख मारीत होत्या.

महंमद घोरीचें औद्धत्य यावेळीं कापराप्रमाणें नाश पावलें होतें. तो गरीब गायीप्रमाणें त्या सभेंत हताश होऊन दीनवदनानें हात जोडून उभा राहिला होता. ही त्याची स्थिति पाहून, पृथ्वीराज सिंहासनावरून उतरून त्याच्या जवळ गेला व त्याला म्हणाला, " तातारराजा, आपण मुसलमान आहांत आणि मी हिंदू आहे. यावेळीं आपण पराजित आणि बंदीवान असून मी विजयी होऊन आपल्यापुढें उभा आहे. असें आहे, तरी आपण वीरपुरुष आहांत. आपलें रणकौशल्य आणि शौर्य पाहून मी आपल्यावर प्रसन्न झालों आहें हिंदूलोक वीरांची पूजा करतात. वीरपुरुष शत्रु असला तरी त्याचा आम्ही कधीं उपमर्द करीत नाहीं. हे मुसलमान वीरा, युद्धसमाप्तीनंतर कोणाचा ना कोणचा तरी पक्ष विजयी होतो. दुर्भाग्यानं आज आपण पराजित झाला आहांत ! तरी पण आपल्या राजसन्मानाच्या विरुद्ध कोणीहि कांहीं बोलू शकणार नाहीं. यास्तव आपण लेशमात्रहि कष्टी होण्याचें कारण नाहीं "

पृथ्वीराजाचें हें भाषण ऐकून महंमद घोरी फारच आश्चर्यचकित झाला. पृथ्वीराज आपल्याशीं अशा तऱ्हेचें भाषण करील अशी गोष्ट त्याच्या कधीं स्वप्नींहि आली नव्हती. पृथ्वीराजाच्या भाषणावर आपण काय उत्तर द्यावें हेंहि त्याला सुचेना. एक वेळ त्याला असें वाटलें कीं, अशा तऱ्हेचें भाषण करून पृथ्वीराज, माझ्यासारख्या पराजिताची थट्टा तर करीत नसेल ना !

## षोडष काण्ड.

सर्व सभामंडळ निस्तब्ध असून, कोणाच्याहि तोंडून एक चकाराहि निघत नव्हता. मध्यान्हकालीन सूर्याच्या प्रखर किरणांत पृथ्वीराजाच्या मुकुटांवरील मरकतमण्याची दिव्य प्रभा फारच उज्वलित झाली होती. राजसभासदांची दृष्टी चुकवून महमद घोरीनें पृथ्वीराजाचें मुखमंडल हलकेंच चोरून अवलोकन केलें, तेव्हां त्याला त्यांत कापट्यभावाचें कांहींच चिन्ह दिसलें नाहीं.

पृथ्वीराज पुन्हां म्हणाला, " हे तातारच्या राजवीरा, हिंदूलोक आपल्या हाताश शत्रूला मैत्रीच्या शृंखलेंत बद्ध करून आपलासा करून घेत असतात. पराजिताशीं दयेचं वर्तन ठेवणं हाच आमचा राजधर्म आहे. "

आतां मात्र घोरीच्या चेहेऱ्यावर आणि नेत्रांत उत्तेजनाची वीज चमकूं लागली. तो धीटपणानें म्हणाला, " हिंदूराजा, मी पराजित झालों आहें—बंदीवान आहें, तरी पण मी इथें तुमच्यापाशीं दयेची भिक्षा मागणार नाहीं. तुम्ही यापुढें आपला मोठेपणा कसा दाखवणार आहांत तेंहि जाणण्याची माझी इच्छा नाहीं. न्यायान्यायाचा विचार करून दया दाखवणारा जो मालक आहे तो तुम्हाला व मला पाहातो आहे. हे हिंदू वीरराजा, आजपर्यंत मी कोणाहि मानवापुढें हात जोडलेले नाहींत. मी फक्त देवापुढें दयेसाठीं रोज हात जोडीत असतों. "

गभीर आणि करुणायुक्त वाणीनें पृथ्वीराज म्हणाला, " तुम्ही आणि मी, या दुनियेच्या मालकाला जरी भिन्न नांवांनीं संबोधितों, तरी तो सर्वांचा एकच मालक आहे. त्याचा प्रतिनिधि या नात्यान आज जो मी तुमचा गौरव करतों आहे तो तुमच्या स्वप्नींहि तुम्ही पाहिला नसेल. राजसिंहासन हें नेहमीं क्षमेच्या महत्वानं भरलेलं असतं. पठाण-राज, तुम्ही या सिंहासनापुढें—पराजित होऊन, आपला विचार प्रगट करण्यासाठीं उभे राहिलां आहांत ! "

महमद घोरीचें मुख लाल झालें. त्या तातार राजानें विधर्मी लोकां-पुढें विदेशांत बंदीजनाप्रमाणें हात जोडून दयेच्या भिक्षेवर स्वदेशी परत जाण्याचें कार्य करावें ही केवढी निंदास्पद आणि शरमेची गोष्ट आहे !

पृथ्वीराजाचें संभाषण ऐकून महमद घोरीनें आपला गौरव, आपला सन्मान आणि आपली प्रतिष्ठा हीं मनांत आणून तो त्याच्या दयेची भिक्षा मागण्यास नाकबूल झाला. अशा तऱ्हेनें जिवंत राहाण्यापेक्षां मेलेलें फार बरें असें मनांत आणून तो बोलला, " दिल्लीसाम्राट, तुमच औदार्य पाहून मी तुम्हांला धन्यवाद देतों; परंतु तुमच्यापुढें मी दयेची भिक्षा मागण्यास मात्र तयार नाहीं. मी तुमचा शत्रु असून तुमच्यापुढें उभा आहें. शत्रूला जें बक्षीस द्यायच असेल तें घ्यायला मी परमे-श्वराच्या इच्छेनं तयार आहें. "

## शोडश काण्ड

पृथ्वीराजाच्या गभीर वदनावर हास्याची विद्युल्लता चमकली. तो म्हणाला, " मुसलमानवीरा, कठोरतेपेक्षां सदयतेनें शत्रूला मित्र करून घेण्याचा जो आमचा राजधर्म आहे त्याच्याविरुद्ध मी कसा जाईन ! माझ्यापाशीं क्षमा मागण्यात तुम्हाला अप्रतिष्ठा वाटते आहे म्हणून, मीच तुमची सधी करण्याबद्दल प्रार्थना करतों. तरी पण तुम्ही अस समजू नये कीं, हा पृथ्वीराज तुमच्याशी लढायला भिऊन सधी करायला तयार झाला आहे. मी केवळ प्रजचा रक्तपात न होऊ देण्यासाठींच तुमच्याशी सधी करायला तयार झालों आहें. युद्धानें देशाचा खराबा होऊन प्रजेला कष्ट सोसांव लागतात, म्हणून तें अरिष्ट टाळण्यासाठीं मीं हा मार्ग योजला आहे तुम्हाला बदीवान करून ठेवण्यान अथवा तुम्हाला सजा देऊन सोडून देण्यान म्हणजे लढाई बद होणार आहे अस काहीं नाहीं त्या योगान हिंदू व मुसलमान यांच्यातला वैरभाव वाढणारच आहे यास्तव, तुम्हाला कोणच्याहि तऱ्हेच दुःख न देता तुमच स्वातत्र्य तुम्हाला परत देण्याची माझी इच्छा आहे. मी तुम्हांला मोठ्या आद-रान तुमच्या तातार देशाला नेऊन पोचवीन. तिथें गेल्यावर हिंदूच्या सबधाचा द्वेष विसरून जाऊन मित्रत्वाचंच नेहमीं ध्यान करा. आतां इतउत्तर तुम्ही आमच्या राज्यावर कधींहि चढाई करून येणार नाहीं अशी मला आशा .आहे. तुम्ही केलेल्या अपकाराचीहि आठवण आम्ही विसरून जाऊ. आपणां उभयतांत जर मित्रत्व नांदेल तर आपली

लोकांचीं राज्यें-शान्ति, शिल्प आणि व्यापार यांनीं पूर्ण भरभराटीचीं होऊन मोठीं सपन्न होतील अशी माझी खात्री आहे."

पृथ्वीराजाचें भाषण ऐकून घोरी मुग्ध झाला. इतकें मोठें औदार्य आणि इतकी मोठी प्रजावत्सलता त्यानें आजपर्यंत कोणाहि राजांत पाहिली नव्हती. पृथ्वीराजाच्या अगम्य ह्या सद्गुणांनीं महमद घोरी अगदीं दिपून गेला. त्यानें आपली चूक कबूल करून पृथ्वीराजाची क्षमा मागितली व पृथ्वीराजाच्या म्हणण्याप्रमाणें तहनाम्यावर सही केली. हिंदुमुसलमानी बंधुत्वाच्या पवित्र बंधनानें तें दोघे सन्मित्र बनून त्यांनीं एकमेकांनां आलिंगनें दिलीं. तें त्यावेळचें बंधन जर तुटलें गेलें नसतें तर आज भारतवर्षाची अधोगति खास झाली नसती; परंतु विधात्याची करणी अगाध असते; ती कोणाला समजत नाहीं.

असें आहे तरी अजून आम्हांला आशा आहे कीं, हिंदु आणि मुसलमान यांच्यामध्यें अजूनहि असा कोणी तरी हरीचा लाल पैदा होईल कीं, जो ह्या दोन्ही जातींनां बंधुत्वाच्या पवित्र बंधनानें गच्च आवळून टाकून हिंदुस्तानाला अजून उन्नतीचें शिखर दाखवील.



# सप्तदश काण्ड.

## आत्मद्रोह



( स्रग्धरा. )

लज्जे तुं सिंधुमध्ये बुडुनि, गिरिशिरीं जाई गे तूं प्रतिष्ठे ।
शान्ते प्रान्तीं दिशान्तीं वस, सत्याचि रे स्वर्वसा गर्व तिष्ठे ॥
तेजा पातालमूलीं दड, त्याग भगवन्माननात्यास सोडी ।
प्रेमानें स्वार्थतृष्णे, सतत तुजसि मन्मानसातेच जोडी ॥

तहनाम्यावर सही झाल्याला पुरें एक वर्षहि झालें नाहीं तोंच पुन्हां मुसलमानांनीं पृथ्वीराजावर स्वारी केली बंधुत्वाचें पवित्र बंधन आणि तहनामा यांना लाथांखालीं तुडविण्यांत आलें. पृथ्वीराजानेंहि ‘न नीचो यवनात् परः’ हें वाक्य लक्षांत आणून, शत्रूचा मार्ग अडविण्यासाठीं ससैन्य कूच केलें.

त्यावेळीं सर्वांनीं एकमतानें असें म्हटलें कीं, “महंमद घोरीला बंधमुक्त केला ही फार वाईट गोष्ट झाली. त्याला बंदीवान करून ठेवला असता तर फार बरें झालें असतें.”

## चन्द्राणी समशेर !

मनुष्याच्या क्षुद्र अंतःकरणांतहि भगवताचें अधिष्ठान असतें. पृथ्वीराजाची ही एक मोठी चूक झाली कीं, आपल्या स्वताच्या सत्व-गुणानें—साधेपणानें त्यानें महमदघोरीलाहि आपल्या सारखाच सरळ स्वभावाचा मानला व त्याच्याशीं सल्ला केला. त्याच्या त्या विश्वासाचें आज चांगलेंच फळ त्याला मिळालें.

तिरोरीच्या त्या अफाट मैदानांत रणभेरीचा गडगडाट ऐकू येऊ लागून—दमामे, नगारे, झडूं लागले व सनया, सूर, शंख, भेरी—निनादित झाली पृथ्वीराजानें आपल्या व आपल्या सामंताच्या सैन्यां-सह त्याच रणभूमीवर डेरे दिले.

वाचकहो, पुढील वृत्तात लिहिण्याची आमची खरोखरीच इच्छा नाहीं. तो वृत्तांत लिहिण्यापेक्षा शरमेनें आपलें मुख लपवून समाजा पासून दूर कोठें तरी जाऊन लपून राहणेंच बरें असें वाटतें हर हर ! जे हिंदू ऐक्यासाठीं, स्वार्थत्यागाकरितां, आत्मविसर्जनार्थ या जगांत सर्वश्रेष्ठ मानले जात होते त्याच्याचपैकीं जो जयचंद तो आज दिल्लीच्या तख्ताच्या अभिलाषानें मुसलमानांना जाऊन मिळाला व त्यामुळें, हिंदुवंशाला कलंकानें घेरलें, हिंदुची कीर्ति रसातळाला गेली. आमच्या पूर्वजांचीं उन्नत मस्तकें परस्थांपुढें अवनत झालीं. आम्ही येथेंच ठार बुडून अक्षय पारतंत्र्याच्या शृंखलांनीं बद्ध झालों. नराधमा जयचंदा, आपल्या उत्कर्षासाठीं तू ज्या दुष्कृत्यांत आपला मेंदू घातला होतास

त्या तुझ्या नीच घातकी मस्तकावर—हिंदु तर राहोतच पण इतर सर्व विदेशी लोकसुद्धां आपापल्या पादत्राणाच्या फटकाऱ्यांचा वर्षाव केल्याशिवाय कधींच राहायचे नाहींत. तुझ्या नांवावर आणि तोंडावर थुंकल्याशिवाय कोणी अन्नग्रहणहि करणार नाहींत ! तुझा मस्तक सदोदीत नरकांत सर्व पडद्यांच्या खालीं पडेल. सयोगितेच्या हरणाचा सूड उगविण्यासाठीं- चांडाळा जयचंदा, तू आपलें सैन्य, द्रव्य, रसद घेऊन परकीय शत्रूला आपल्या भावाच्या—देशबंधूच्या विरुद्ध जाऊन मिळास व त्यांचा हितकर्ता बनून स्वतःसह सर्व भारतभूमीला पारतंत्र्यांत टाकणारा आद्य कलिपुरुष उत्पन्न झालास याची तुला कांहीं शरम ! परमेश्वरा, ' कर्मणो गहना गतिः ' हेंच तुझें वाक्य खरें आहे !

हेरांकडून ही बातमी पृथ्वीराजाला आगाऊच समजली होती. आपल्याला विजय मिळावा म्हणून जयचंदानें परकीय मुसलमानांची मदत मागितल्याबद्दल पृथ्वीराजाला फार वाईट वाटलें. दुःखानें त्याची छाती विदीर्ण झाली. अभिमानानें त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तो आपल्या मनाशीं म्हणूं लागला " काय, वैर साधण्याचा त्याला हा एवढा एकच उपाय होता ? अशा तऱ्हेनें सूड घेणें त्याला योग्य होतें काय ? अशा तऱ्हेनें सूड घेणाऱ्या त्या मूर्खाला, आपण भविष्यत् कालीनें आपल्या वंशजांच्या स्वातंत्र्याच्या गळ्यावर सुरा

फिरवीत आहोंत—इतकें समजण्याची सुद्धां अक्कल नसावी ना! हाय! हाय!! मनुष्याचें हृदय इतक्या नीच तऱ्हेनें अधोगतीला जाऊं शकतें ना!"

तिरोरीच्या मैदानांत मुसमानांच्या छावणीच्या दक्षिणभागीं कनोजच्या जयचंदराजाच्या सैन्याचा तळ पडला होता. त्या छावणींत जो सर्वांत ऊंच दिसंत होता तोच जयचंदाचा तंबू होता. त्या तंबूवर सोन्याच्या पत्र्यात मढवलेल्या उंच कांठीवर पिंवळ्या रंगाचें निशाण अडकविलेलें असून तें हवेमध्यें फडफड आवाज करून जयचंदाच्या स्वार्थ बुद्धिचा तिटकारा व्यक्त करीत होतें. त्यावर सूर्याचें चिन्ह होतें परंतु तेंहि त्याच्या दुर्बुद्धीसा त्रासून क्रोधानें लाल झालेलें दिसत होतें. अशा थाटानें जयचंद आज आपल्या देशबंधूंशीं लढण्यासाठीं परकीयांची मदत घेऊन रणांगणावर अवतीर्ण झाला होता.

याच वेळीं पृथ्वीराज आपल्या संयोगिता पत्नीसह वेष पालटून जयचंदाच्या छावणींत आला आहे. आपसांत लढाई होऊं नये व झालीच तर हींत मुसलमानांच्या बाजूला जयचंदानें मदत करूं नये अशी सदंपट करण्यासाठीं तें जोडपें तेथें गेलें आहे. त्या जोडप्याच्या आसपास त्याचे शरीरसंरक्षकहि वेष पालटून तें जोडपें परत केव्हां येतें याची वाट पहात आहेत.

# सप्तदश काण्ड.

आज बरेच दिवसांनीं आपल्या पित्याची लाडकी मुलगी आपल्या पित्याच्या छावणींत त्याला भेटायला आली आहे. सयोगितेचें काळीज कांपतें आहे. जणूं काय तिनें महदपराध केला असल्यामुळें ती थर थर कांपत असून आपल्या पित्याच्या रोषाग्नीपुढें शिक्षा भोगायला येऊन उभी राहिली आहे.

चारी बाजूंनीं वृक्षांची छाया पसरली असून, आकाशांत मेघ-गर्भांत चंद्र आपले डोळे मिचकावीत खेळतो आहे. भव्य मैदानांत हजारों तंबू उभारलेले आहेत. सर्व तबु अंधःकारांत लुप्तप्राय दिसत-आहेत. सर्वत्र शांतता आहे. फक्त पाहारेवाले मात्र इकडे तिकडे पहारा देत हिंडताहेत. त्यांच्या पायांचे शब्द व कमरेच्या तरवारींची खळखळ मात्र काय ती त्या निस्तब्ध रात्रीच्या शांततेचा भंग करीत आहेत.

अशा त्या निस्तब्ध रात्रीं आपली मुलगी व जांवयी यांना पाहून सर्पाच्या भीतीनें गांगरून जाणाऱ्या प्राण्याप्रमाणें—जयचंद त्यांच्या-कडे पाहूं लागला. भडकत असलेल्या अग्नींत आज्यधारा पडावी त्याप्रमाणें जयचंदाच्या हृदयांत—त्यांना पाहून—पूर्वीचा अनादर फारच जोरानें भडकला. दिल्लीचा साम्राट आणि त्याची राज्ञी त्यावेळीं जय-चंदाच्या तंबूंत त्याच्यापुढें उभीं असतां, त्यांचा आदरसत्कार करणें बाजूला राहून, त्यांना त्यानें बसा म्हणून सुद्धां म्हटलें नाहीं. त्यांच्याशीं भाषण करण्यांत आपली अप्रतिष्ठा आहे असें त्याला वाटलें. तीं दोघें

काही वेळ गुपचुप उभीं राहिली. कोणीच कोणाशीं कांहीं बोलेना ! जयचंद आपल्या पलगावरील मखमलीच्या गादीवर उठून मात्र बसला इतकेंच काय तें.

पित्यापुढें गेल्याबरोबर तो आपल्याला ठार मारून टाकील अथवा बाजूला हाकून देईल अशी प्रथम सयोंगितेला भीति होती, परतु त्यांपैकी जेव्हां काहीच घडून आलें नाही तेव्हां तिनें आपल्या अपराधाची पित्यापाशीं क्षमा मागितली. जयचदाचें हृदय स्नेहशून्य झालें असल्यामुळें—त्यानें फार दिवसांनीं भेटलेल्या आपल्या मुलीला आशीर्वादहि दिला नाहीं किंवा तिचें कुशलहि विचारलें नाहीं; परंतु दुष्ट शब्दांनीं तिचें ताडन मात्र केलें.

आपल्या देखत आपल्या प्रियपत्नीचा इतका अपमान होत असतांहि पृथ्वीराजानें कांहींच गडबड केली नाहीं; मात्र त्याचें मस्तक क्रोधानें सतप्त झालें. सतापानें त्याचें डोळे लालभडक झाले. तो तेथें भारतप्रजेच्या रक्षणासाठी व भारतमातेच्या स्वातंत्र्यरक्षणाकरितां गेलेला असल्यामुळें त्यानें आपलें हृदय दगडाप्रमाणें घट्ट करून होत असलेला सारा अपमान निमुटपणें सहन केला. ह्या वेळपर्यंत जयचंद पृथ्वी-राजाबरोबर एक शब्दहि बोलला नव्हता. त्यामुळें पृथ्वीराजानें त्याच्या बोलण्याची आशा सोडून तो म्हणाला, “ महाराज, आम्ही आपल्या

रोषाला पात्र आहोंत. आमच्या हातून जो कांहीं अपराध घडला आहे त्याबद्दल आपण स्वतां आम्हाला शिक्षा करावी. ती शिक्षा भोगण्यासाठींच आम्ही इथें आलों आहोंत."

जयचंदानें त्याचें हें बोलणें ऐकलें कीं नाहीं कोण जाणें!

पृथ्वीराज दुःखी अंतःकरणानें पुन्हा बोलला, "दिल्लीचें राजसिंहासन घेण्यासाठीं जे आपण इतके उत्सुक आहांत त्या तुम्हाला मी तें बिनहरकत देतों. आम्ही दोघेजण निर्वासितांप्रमाणें, राज्याबाहेर कोणच्याहि देशांत केवळ एका वस्त्रानिशी चालते होतों, अथवा आपल्या बंदिशाळेंत कैदी होऊन आजन्म राहतों. आम्ही हवे तेव्हां आपल्या सेवेला हजर आहोंत. जें योग्य वाटेल तें करा! आम्हा उभयतांचा प्राण घेण्यानेंहि जर आपली क्रोधशांति होत असेल, तर आम्ही आपले प्राण देण्यालाहि खुषीनें तयार आहोंत आपल्या त्या तशा कठोर दंडाला आपला आशीर्वाद समजून क्षणभरहि दुःखी होणार नाहीं युक्तिप्रयुक्तीनें घरांतलें भांडण घरांत मिटवून परकीयांवर एकजुटीनें घसरून पडण्याच्या ऐवजीं आपण स्वगृहाचा नाश करण्यासाठीं परकीयाला मदत कराल ही गोष्ट माझ्या स्वप्नींहि आली नव्हती. महाराज, माझा सूड घेण्यासाठीं आपण कोणच्या तऱ्हेची कंबर बांधली आहे याचा आपण नीट विचार करा. प्रभुकृपेनें माझा पराजय न होवो. परंतु झालाच तर आपण असें समजूं नका कीं, आपला बचाव त्यांच्या हांतून होईल.

माझ्याबरोबर ते आपल्या कनोजच्या राजालाहि धुळीला मिळविण्यास कमी करणार नाहींत. यास्तव, आपणां उभयतांचीं राज्यें रक्षण व्हावींत अशी जर आपली इच्छा असेल, तर आपण आतांच येथून निघून चला आणि दिल्लीच्या सिंहासनावर बसून आपसांतला तटा मिटवून टाका ! ''

पृथ्वीराजाचें हें भाषण अरण्यरोदनाप्रमाणेंच शेवटीं ठरलें. सयोगितेनें केलेली करुणापूर्ण प्रार्थनाहि निष्फळ झाली. जयचंदाच्या मनाला लवमात्रहि पाझर फुटला नाहीं. मुसलमानांना साह्य करण्याच्या त्याच्या दृढ निश्चयापासून तो यत्किंचितहि ढळला नाहीं. युद्धानंतर दिल्लीचें काय होईल अथवा स्वदेशाचें काय होईल, याचा विचार करण्यास त्यानें आपल्या मेंदूला फुरसतच दिली नाहीं. त्यानें त्यावेळीं केवळ पृथ्वीराजाला कैद करण्याचें मनांत आणून—मुसलमानाची मदत मागण्यासाठीं काय युक्ति योजावी याच विचारांत आपलें डोकें गुंतवलें होतें. त्यावेळीं जयचंदाला पृथ्वीराजाला कैद करणें कांहीं अवघड नव्हतें; परंतु त्याच्यांत तितकें धैर्य आलें नाहीं. त्यानें फक्त '' लढाईच्या मैदानावर पाहू '' इतकेंच बोलून पृथ्वीराजाला निघून जायला सांगितलें. त्यावेळीं जयचंद इतका कठोर हृदयाचा झाला होता कीं, त्यानें सयोगितेशीं ती परत जातांनां एकहि शब्दोच्चार केला नाहीं.

## सप्तदश काण्ड.

पृथ्वीराज आणि संयोगिता यांनीं एक दीर्घ निःश्वास सोडून आपले अश्रु पुसले आणि आपल्या छावणीचा मार्ग धरला. जो पृथ्वीराज चव्हाण दिल्लीचा सम्राट असून—आपल्या वीर्यात, गौरवांत व संपत्तींत सर्व राजापेक्षा श्रेष्ट होता तो अपमानीत होण्यासाठीच आपल्या राणी-सह जयचंदाच्या तंबूत वेष पालटून आला होता काय ? नाही. ! तो आपल्या हिंदभूमातेची लाज रक्षण करण्यासाठीं तेथें गेला होता व तेव-ढ्याचसाठीं त्यानें झालेला अपमान निमुटपणें सहन केला.

वाहवारे जयचंदा ! तू कोण आहेस ? तू मनुष्य आहेस कीं प्रेतात्मा आहेस ? मानवी देह धारण करणारें तू नरपिशाच तर नाहींस ना ? स्नेहाच्या पवित्र—मंगलकारक स्पर्शानें तुच्छ स्वार्थाचा लोभ आणि दुष्कृत्यानें सूड घेण्याची इच्छा यांना दूर सारून, आपल्या हृदयाला एक क्षणभरहि उदार आणि कोमल न बनवणारा असा तू आहेस तरी कोण ?



हिंदूसूर्य युद्ध करणास प्रोत्साहित करील? शस्त्राघातानें त्याचा देह रण-भूमीवर पडला तरी त्याच्या समशेरीची घट्ट मूठ शिथिल झाली नाही. हाय हाय! शत्रूचीं मुंडकी कांपता कांपतां आमच्या रणधीर प्रतिकृतांत-वीर शेवटीं रणचंडीच्या मांडीवर रणभूमींत निद्रिस्त झाला. चव्हाणी-सूर्य मावळला व चव्हाणी समशेरीचा तडाखा इथेंच संपला.

समरसिंह मेला. पृथ्वीराजेंहि हें जग सोडून गेला; तरी पण लढाई थांबली नाहीं. हिंदूसेनेचा पराजय होतो आहे असें पाहून सयोगिता अश्वारूढ झाली व तिनें स्वतां सैनापत्य स्वीकारून आपल्या सैन्याला लढण्याचें प्रोत्साहन देण्याचें काम सुरू केलें. मुसलमान आणि जयचंद यांच्या सेना संयोगितेवर धावल्या. सयोगिता जात्या क्षात्रियकन्या व वीरपत्नी असल्यामुळें साधारण स्त्रियांप्रमाणें भीतीनें कोंपऱ्यांत दडून बसणारी व दोन हातांच्या पंजांत तोंड लपवून रडत बसणारीहि नव्हती. समरभूमीवर येऊन स्वदेशाकरितां, स्वजातीकरितां, स्वराज्या-साठीं, स्वपतीकरितां, आपल्या वंशपरंपरागत कीर्तीच्या रक्षणासाठी—शत्रूचे कठनाळ छेदीत असतां मृत्यु यावा अशी इच्छा करणारी ती होती. यास्तव, तिला जो सध्यां सुप्रसंग अनायासें प्राप्त झाला होता, तो तिनें कसा व्यर्थ दवडावा! रजपूत कुलावतांस गौरवभूता सयोगिता आपली ओळख पटवून देऊन शत्रूला शस्त्रास्त्रांचा धडा देण्यासाठीं तळ-हातावर शिरकमल घेऊन त्वेषानें लढूं लागली होती.

# अष्टदश काण्ड.

पितापुत्रींत घनघोर युद्ध सुरू झालें. सयोगिता आपल्या सेनेच्या अग्रभागीं मोठ्या धाडसानें पराक्रम करीत शत्रूवर स्वसैन्यासह सिंहिणी-सारखी तुटून पडली. पृथ्वीराजाचा नामघोष करून ' हर हर महादे-वाच्या ' गर्जनेंत लांडगेतोड सुरू झाली. लढता लढतां सध्याकाळ झाली तरी युद्ध संपलें नाहीं. पृथ्वीराजाचा नामघोष वारवार त्या सायं-काळच्या आकाशांत दुमदुमू लागला. सयोगितेनें आपला केशपाश मोकळा सोडलेला होता. ती तरवारीनें शत्रूचीं शिरकमलें भरणीदेवीला वाहात वाहात आपला पुढचा रस्ता आक्रमित चालली होती. तो तिचा पराक्रम मुसलमानी सेनेला सहन होईनासा झाला. त्या दिल्लीच्या साम्राज्ञीच्या अपूर्व रणकौशल्यापुढें मुसलमान वीर गलितधैर्य होऊन माना खाली घालून निमुटपणें भीतीनें दशादिशांना पळू लागलें. जय-चंदहि, आपल्या मस्तकावरील घाम पुसून टाकून आपल्या मुलीकडून मिळालेल्या अपयशाचा टिळा आपल्याच हातानें आपल्या कपाळावर लावून रणभूमींतून पळून गेला. सयोगितेच्या रणविजयी सेनेनें आपल्या विजयध्वनींनें सभोंवारचें वातावरण आणि आकाशमंडल कपायमान करून सोडलें.

या युद्धांत—चदन्सिंह, वीरसिंह, अमरसिह, वटिल्या, खीची सरदार, कैमाष वगैरे प्रसिद्ध सरदार रणभूमीवर पतन पावले. चंपा, चमेली; केतकी आणि चित्ररेखा रणभूमीवरच आपापल्या पतींच्या शवांबरोबर

घुसी गेल्या. इच्छिनीकुमारीहि सती आण्यास रक्तांबर परिधान करून तेथें आली.

हाय ! हाय ! ! युद्धांत विजय मिळवून पृथ्वीराजाचे रणशूर मर्द परत घरीं जाऊन करणार काय ! ते सर्व युद्धक्षेत्रांत सुस्नात होऊन पतन पावले असते तरी त्यांना उत्तम वीरगति प्राप्त झाली असती. स्नेहमयी संयोगितेच्या डोळ्यादेखत त्यांना मरण आलें असतें तर फार बरें झालें असतें. काय ? आपल्या जन्मभूमातेचें पातिव्रत्य रक्षण करून आपल्या देशाच्या अपकीर्तीचा कलंक धुऊन काढून, आपला देश पुन्हां स्वतंत्र करून संयोगिता आनंदोत्सव करण्यासाठीं स्वगृहीं परत जाणार आहे काय ? छे: ! तिच्या शोकाची तुलना यावेळीं कोणालाही करितां येणें शक्य नाहीं ! संपूर्ण हिंदुस्तानानें, संपूर्ण हिंदुजातीनें जरी अश्रूंच्या नद्या वाहवल्या तरी तिच्या दुःखाग्नीचा भडका विझणें अशक्य होतें. रड–आक्रांत कर ! संयोगिते, हृदयातवढा आक्रोश कर ! बा हिंदुस्ताना, तूहि तिचा समभागी हो ! आतां कोणाचाच इलाज नाहीं. हाय ! हाय ! त्या शोकरसाचें वर्णन लिहिण्याची शक्ति या लेखणींत नाहीं. काळीज फाटून गेलें आहे.

दारुण शोकाच्या तीव्रज्वाला भडकल्या असल्यामुळें संयोगितेच्या नेत्रांतले अश्रु आटून गेले आहेत. संयोगितेनें मोठ्या धैर्यानें

आपल्या पतीचा मृत देह धारातीर्थी आणविला. इच्छिनीकुमारीहि तेथें आली. चंदनकर्पूरादि सुगंधी द्रव्यांची चिता रचविण्यांत आली.

अर्धेच्या रात्रीच्या निबिड अंधःकारांत तिरीरीच्या मैदानांत कामा नदीच्या तीरावर महान स्मशानभूमींत ती चिता रचण्यात आली होती.

संयोगिता आणि इच्छिनीकुमारी यांनीं शेंदूर फासून रक्तवर्ण वस्त्रें परिधान केलीं आहेत. त्यांनीं त्या चितेला सात प्रदक्षिणा घातल्या. त्यांनीं नंतर पृथ्वीराजाच्या प्रेताचें पादवंदन केलें व ते पाय आपापल्या हृदयाला लाविले. आग भडकली. दिल्लीच्या साम्राज्ञींनी आपले देह त्या भडकलेल्या अग्नींत रिचविले त्यावेळीं त्यांच्या मुखमंडलावर यत्किं-चितहि दुःखाची छाया दिसत नव्हती. अहाहा ! किती तरी तीं सुंदर रूपें ! त्यांच्या त्या रूपांनी भडकलेल्या अग्निशिखानांहि मलीन करून टाकल्या. त्या दोघी सती आपल्या पतीबरोबर जळून खाक झाल्या. युद्धांत हिंदूंना विजयप्राप्ती झाली असतांहि शेवटी हिंदुस्तान परकीयां-च्या गुलामगिरीच्या लोहशृंखलेंत बद्ध झाला.

पृथ्वीराजाची व त्याच्या सामंतांची अवशिष्ट सेना. त्या पवित्र चितेचें भस्म लावून, आपलीं पागोटीं हातांत घेऊन अश्रु गाळीत स्वगृहीं निघून गेलीं. हिंदूंच्या स्वातंत्र्यतेचें हें शेवटचेंच भस्म त्यांनीं लाविले होतें. त्याचें—प्रेमपूर्ण भारतांनीं मोठ्या यत्नानें कां बरें रक्षण

करूं नये ! त्या रणभूमीच्या स्मशानांत त्यानंतर पुन्हां केव्हांहि या जगाला आपल्या सुवासानें आनंदित करणारें पुष्प उत्पन्न झालें नाहीं. जें होतें तें जळून भस्मभूत झालें. प्रभातकाळीं आपल्या मंजुळ गायनानें पक्ष्यांनीं पुन्हां केव्हांच तें स्थान मनोरंजक केलें नाहीं. मधुपानाचे लोभी भ्रमर त्या निस्तब्ध श्मशानकुंजांत गुंजारव करीत असलेले पुन्हां कधींच दिसले नाहींत. चहूं बाजूंनीं हाहाःकार उठला. तो हाहाःकार आपल्या दीर्घ पूर्ण श्वासानें हिंदूंच्या स्वातंत्र्याच्या अखेरीच्या गुलामगिरीच्या सुरूवातीचा इतिहास सांगूं लागून, त्यानें चव्हाणी समशेरीची अखेरची तारीफ केली व इतिहासाचें शेवटचें पृष्ठ वाचून तो अखेरच्या निस्तब्धतेंत विराम पावला.

